॥ श्री ॥

# ॥ अथ ज्योतिषसारस्यानुक्रमणिका प्रारभ्यते ॥

॥ श्री ॥

# ज्योतिषसार.

## शकप्रकरण.

### संवत्सरनामपरिज्ञान.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥श्लोक॥ ॥ शकेंद्रकाला
केयुतःकृत्वाशुन्यरसैर्हृतः ॥ शेषःसंवत्सरोज्ञेयः
प्रभवादिबुधैःक्रमात् ॥ १ ॥

अर्थ— शालिवाहन शकांतील ज्या संवत्सराचें नांव पाहिजे तो शक मांडावा, त्यांत १२ मिळवावे आणि ६० नीं भागावें, शेष राहील तें त्या संवत्सराचें नांव जाणावें.

### संवत्परिज्ञान.

सएवपंचाग्निकुभिर्युक्तःस्याद्विक्रमस्यहि ॥ रेवा-
याउत्तरेतीरेसंवन्नाम्नातिविश्रुतः ॥ २ ॥

अर्थ—जो शालिवाहनाचा शक त्यांत १३५ मिळवावे म्हणजे विक्रम संवत् जाणावा.

### संवत्सर नामानि.

प्रभवोविभवःशुक्लःप्रमोदोथप्रजापतिः ॥ अंगि-
राःश्रीमुखोभावोयुवाधातातथैवच ॥ १ ॥ ईश्वरो
बहुधान्यश्चप्रमाथीविक्रमोवृषः ॥ चित्रभानुःसु -
भानुश्चतारणःपार्थिवोव्ययः ॥ २ ॥ सर्वजित्सर्व
धारीचविरोधीविकृतिःखरः ॥ नंदनोविजयश्चैव
जयोमन्मथदुर्मुखौ ॥ ३ ॥ हेमलंबीविलंबीचविका-
रीशार्वरीप्लवः ॥ शुभकृच्छोभनःक्रोधीविश्वावसु

पराभवौ ॥ ४ ॥ प्लवंगःकीलकःसौम्यः साधारण
विरोधकृत्॥परिधावीप्रमादीचआनंदोराक्षसोऽन-
लः॥५॥ पिंगलःकालयुक्तश्चसिद्धार्थीरौद्रदुर्मतिः
॥ दुंदुभीरुधिरोद्गारीरक्ताक्षीक्रोधनःक्षयः ॥ ६ ॥

अर्थ—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ प्रभव. | १३ प्रमाथी. | २५ खर. | ३७ शोभन. | ४९ राक्षस. |
| २ विभव. | १४ विक्रम. | २६ नंदन. | ३८ क्रोधी. | ५० नल. |
| ३ शुक्ल. | १५ वृष. | २७ विजय. | ३९ विश्वावसु. | ५१ पिंगल. |
| ४ प्रमोद. | १६ चित्रभानु. | २८ जय. | ४० पराभव. | ५२ कालयुक्त. |
| ५ प्रजापति. | १७ सुभानु. | २९ मन्मथ. | ४१ प्लवंग. | ५३ सिद्धार्थी. |
| ६ अंगिरा. | १८ तारण. | ३० दुर्मुख. | ४२ कीलक. | ५४ रौद्र. |
| ७ श्रीमुख. | १९ पार्थिव. | ३१ हेमलंबी. | ४३ सौम्य. | ५५ दुर्मति. |
| ८ भाव. | २० व्यय. | ३२ विलंबी. | ४४ साधारण. | ५६ दुंदुभी. |
| ९ युवा. | २१ सर्वजित्. | ३३ विकारी. | ४५ विरोधकृत् | ५७ रुधिरोद्गारी |
| १० धाता. | २२ सर्वधारी. | ३४ शार्वरी. | ४६ परिधावी. | ५८ रक्ताक्षी. |
| ११ ईश्वर. | २३ विरोधी. | ३५ प्लव. | ४७ प्रमादी. | ५९ क्रोधन. |
| १२ बहुधान्य. | २४ विकृति. | ३६ शुभकृत् | ४८ आनंद. | ६० क्षय. |

## संवत्सराचें फळ.

प्रभवाद्द्विगुणंकृत्वात्रिभिन्र्यूनंचकारयेत् ॥ सप्त-
भिस्तुहरेद्भागंशेषेज्ञेयंशुभाशुभं ॥ १ ॥एकंचत्वा-
रिदुर्भिक्षंपंचद्वाभ्यांसुभिक्षकम्॥त्रिषष्ठेतुसमंज्ञे-
यंशून्यंपीडानसंशयः ॥ २ ॥

अर्थ— प्रभवादि संवत्सरा पासून चालते संवत्सरा पावेतों मोजावे आणि ते दुप्पट करावे, त्यांतून तीन काढावे, बाकी राहील त्यांस सातानीं भागावें शेष उरेल त्याचें शुभाशुभ फल पहावें. तें असें कीं, १ अथवा ४ उरले तर महर्गता. ५।२ उरले तर सुभिक्षता. ३।६ उरले तर धारण सम राहील, आणि शून्य आलें तर जनांस पीडा जाणावी.

## संवत्सरांचे स्वामी.

युगंभवेद्वत्सरपंचकेनयुगानिचद्वादशवर्षषष्ठ्या

॥ भवंतितेषामधिदेवताश्चक्रमेणवक्ष्यामिमुनिप्रणीताः ॥ १ ॥ विष्णुर्जीवःशक्रोदहनस्त्वष्टाअहिर्बुध्न्यः पितरः ॥ विश्वेदेवाश्चंद्रज्वलनौनासत्यनामानौचभगः ॥ २ ॥

अर्थ — पांच वर्षांचें एक युग याप्रमाणें साठ संवत्सरांचीं युगें बारा आणि त्यांचे स्वामी १२-विष्णु१ बृहस्पति२ इंद्र३ अग्नि४ ब्रह्मा५ शिव६ पितर७ विश्वेदेव८ चंद्र९ अग्नि१० अश्विनीकुमार११ सूर्य१२.

## भेद.

संवत्सरःप्रमथकःपरिवत्सरोन्यस्तस्मादिडान्विदितिपूर्वपदाद्भवेयुः ॥ एवंयुगेषुसकलेषुतदीयनाथावन्ह्यर्कशीतगुविरिंचशिवाःक्रमेण ॥ १ ॥

अर्थ — इष्टशकाला ५ नीं भागावें. शेष राहील तें संवत्सराचें नांव अनुक्रमें जाणावें. प्रथम संवत्सराचा स्वामी वन्हि, द्वितीय परिवत्सराचा स्वामी अर्क, तृतीयइडावत्सराचा स्वामी चंद्र, चतुर्थ अनुवत्सराचा स्वामी ब्रह्मा आणि पंचम इद्वत्सराचा स्वामी शिव.

## अन्य मतेतु.

आनंदादिर्भवेत्ब्रह्माभावादिर्विष्णुरेवच ॥ जयादिःशंकरःप्रोक्तःसृष्टिपालननाशकाः ॥ १ ॥

अर्थ — आनंदादिक संवत्सर २० ह्यांचा स्वामी ब्रह्मा तो सृष्टिकर्ता १, भावादिक संवत्सर २० ह्यांचा स्वामी विष्णु तो पालनकर्ता २, जयादिकसंवत्सर २० ह्यांचा स्वामी रुद्र तो संहारकर्ता ३.

## ऋतुप्रकरण ॥ अयन ॥

शिशिरपूर्वमृतुत्रयमुत्तरंह्ययनमाहुरहश्चतदामरं ॥ भवतिदक्षिणमन्यऋतुत्रयंनिगदितारजनीमरुतांहिसा ॥ १ ॥

अर्थ — शिशिर, वसंत, ग्रीष्म या तीन ऋतूंत उत्तरेस सूर्याची गति होत्ये,

त्यास उत्तरायण ह्मणावें; तो देवांचा दिवस. वर्षाऋतु, शरदृतु आणि हेमंत ऋतु या तीन ऋतूंत सूर्याची गती दक्षिणेस होत्ये त्यास दक्षिणायन ह्मणावें ती देवांची रात्री होय.

## अयनामध्यें शुभाशुभ कर्मे.

गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठाविवाहचौलव्रतबंधदीक्षाः ॥
सौम्यायनेकर्मशुभंविधेयंयद्गर्हितंतत्खलुदक्षिणेच १

अर्थ—गृहप्रवेश, देवप्रतिष्ठा, विवाह आणि चौल, व्रतबंध, मंत्रग्रहणादिक हीं शुभकर्मे उदगयनांत करावी. या कर्मांहून रहित कर्मे तीं दक्षिणायनांत करावीं.

## संक्रांतिपरत्वेंऋतु.

मृगादिराशिद्वयभानुभोगात्षडर्तवःस्युःशिशिरो वसंतः ॥ ग्रीष्मश्चवर्षाचशरच्चतद्वद्धेमंतनामाक-थितःसषष्ठः ॥ १ ॥

अर्थ—मकरादि २ राशि सूर्यानें भोगिल्या म्हणजे १ ऋतु होतो या रीतीनें राशि १२ आणि ऋतु ६ वर्षांत भोगितात. यास उदाहरणः—

| राशि | ऋतु | राशि | ऋतु | राशि | ऋतु |
|---|---|---|---|---|---|
| १ मकर.<br>२ कुंभ. | शिशिरऋतु.१ | ५ वृषभ.<br>६ मिथुन. | ग्रीष्मऋतु.३ | ९ कन्या.<br>१० तूळ. | शरदृतु. ५ |
| ३ मीन.<br>४ मेष. | वसंतऋतु.२ | ७ कर्क.<br>८ सिंह. | वर्षाऋतु.४ | ११ वृश्चिक.<br>१२ धन. | हेमंतऋतु.६ |

## मतांतर राशिपरत्वें.

मेषादितोद्विद्विभभानुभोगाद्वसंतपूर्वाऋतवःषडुक्ताः

| राशि | ऋतु | राशि | ऋतु | राशि | ऋतु |
|---|---|---|---|---|---|
| १ मेष.<br>२ वृषभ. | वसंतऋतु. १ | ५ सिंह.<br>६ कन्या. | वर्षाऋतु.३ | ९ धन.<br>१० मकर. | हेमंतऋतु.५ |
| ३ मिथुन.<br>४ कर्क. | ग्रीष्मऋतु.२ | ७ तूळ.<br>८ वृश्चिक. | शरदृतु. ४ | ११ कुंभ.<br>१२ मीन. | शिशिरऋ.६ |

## मासपरत्वेंऋतु.

चैत्रादिभ्यांद्विमासाभ्यांवसंतात्ऋतवश्चषट् ॥

दाक्षिणात्याःप्रगृण्हंतिदैवेपित्रेचकर्माणि॥ १ ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ चैत्र. | वसंतऋतु. | ५ श्रावण. | वर्षाऋतु. | ९ मार्गशीर्ष. | हेमंतऋतु. |
| २ वैशाख. | | ६ भाद्रपद. | | १० पौष. | |
| ३ ज्येष्ठ. | ग्रीष्मऋतु. | ७ आश्विन. | शरद्दतु. | ११ माघ. | शिशिरऋ |
| ४ आषाढ. | | ८ कार्तिक. | | १२ फाल्गुन. | |

दक्षिणदेशीं देवपितृकर्मांत घेतात .

# मास प्रकरण.

## मासपरिज्ञान.

पुर्वेराशिंपरित्यज्यउत्तरांयांतिभास्करः॥सारा
शिःसंक्रमाख्यास्यान्मासर्त्वयनहायने ॥ १ ॥

अर्थ—पूर्वराशीचा त्याग करून पुढील राशीस सूर्य जातो तो मेषादि१२ सं. क्रांति मास,ऋतु,वर्ष व अयन यांचे गणने विषयी होतो.

दर्शावधिंमासमुशंतिचांद्रंसौरंतथाभास्करराशि
भोगात् ॥ त्रिंशत्‌दिनंसावनसंज्ञमार्यानाक्षत्रमिं-
दोर्भगणाश्रयाञ्च ॥ १ ॥

अर्थ—चांद्रमास म्हणजे शुक्लप्रतिपदे पासून अमावास्ये पर्यंत होतो. सौरमास ह्मणजे सूर्याचा एक राशि भोग जाहला असतां त्यास ह्मणावें. सावन ह्मणजे ३० दिवसांचा मास जाणावा. नक्षत्रमास ह्मणजे नक्षत्रांचें परिभ्रमण चंद्रानें केलें असें म्हणतात.

## मासांचीं नांवें सूर्य व देवता.

मधुस्तथामाधवसंज्ञकश्चशुक्रःशुचिश्चाथनभोनभ-
स्यः ॥ तथेषऊर्जश्चसहाःसहस्यस्तपस्तपस्यश्चय-
थाक्रमेण॥ १ ॥अरुणोमाघमासेतुसूर्योवैफाल्गुनेत-
था॥चैत्रमासेतुवेदांगोभानुर्वैशाखएवच॥ २॥ज्येष्ट-
मासेतपेदिंद्रआषाढेतपतेरविः॥गभस्तिःश्रावणेमा-

सेयमोभाद्रपदेतथा॥३॥सुवर्णरेताःश्वयुजिकार्तिके-
चदिवाकरः॥मार्गशीर्षेतपोन्मित्रःपौषेविष्णुःसनात-
नः॥४॥इत्येतेद्वादशादित्यामासनामान्यनुक्रमात्॥
केशवंमार्गशीर्षेतुपौषेनारायणंविदुः॥माधवंमाघमा-
सेतुगोविंदमथफाल्गुने॥५॥चैत्रेविष्णुंतथाविंद्याद्वै-
शाखेमधुसूदनं॥त्रिविक्रमंतथाज्येष्ठेआषाढेवामनं-
विदुः॥६॥श्रावणेश्रीधरंविद्धिहृषीकेशंतुभाद्रके॥
आश्विनेपद्मनाभंचऊर्जेदामोदरंविदुः॥७॥मार्गशी-
र्षेविशालाक्षीपौषेलक्ष्मीश्चदेवता॥माघेतुरुक्मिणी
प्रोक्ताफाल्गुनेधात्रिनामिका॥८॥चैत्रेमासिरमादेवी
वैशाखेमोहिनीतथा॥पद्माक्षीज्येष्ठमासेतुआषाढेक-
मलेतिच॥९॥कांतिमतीश्रावणेचभाद्रेतुअपराजि-
ता॥पद्मावतीआश्विनेतुराधादेवीतुकार्तिके॥१०॥

अर्थ—

| | नांवें. | नांवें. | सूर्य. | देवी. | देवता. |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्रमास. | मधु. | वेदांग. | रमा. | विष्णुदेवता. |
| २ | वैशाख. | माधव. | भानु. | मोहिनी. | मधुसूदन. |
| ३ | ज्येष्ठ. | शुक्र. | इंद्र. | पद्माक्षी. | त्रिविक्रम. |
| ४ | आषाढ. | शुचि. | रवि. | कमला. | वामन. |
| ५ | श्रावण. | नभ. | गभस्ति. | कांतिमती. | श्रीधर. |
| ६ | भाद्रपद. | नभस्य. | यम. | अपराजिता. | हृषीकेश. |
| ७ | आश्विन. | इष. | सुवर्णरेता. | पद्मावती. | पद्मनाभ. |
| ८ | कार्तिक. | ऊर्ज. | दिवाकर. | राधा. | दामोदर. |
| ९ | मार्गशीर्ष. | सह. | मित्र. | विशालाक्षी. | केशव. |
| १० | पौष. | सहस्य. | विष्णु. | लक्ष्मी. | नारायण. |
| ११ | माघ. | तप. | अरुण. | रुक्मिणी. | माधव. |
| १२ | फाल्गुन. | तपस्य. | सूर्य. | धात्री. | गोविंद. |

## वारपरत्वें मासफल.

पंचार्कवासरेरोगाःपंचभौमेमहद्भयम् ॥ पंचार्कि
वाराद्दुर्भिक्षंशेषावाराःशुभप्रदाः ॥ १ ॥

अर्थ—एका महिन्यांत ५ रविवार आले तर रोग फार उत्पन्न होतील. तसेच ५ भौमवार आले तर भय मोठें उत्पन्न होईल; अथवा ५ शनिवार आलेतर दुर्भिक्ष होईल. शेप राहिले ते वार शुभप्रद जाणावे.

## पक्ष.

पूर्वापरंमासदलंहिपक्षौपूर्वापरौतौसितनीलसंज्ञौ ॥
पूर्वस्तुदेवस्त्वपरश्चपैत्र्यःकेचित्तुकृष्णेसितपंचमी-
तः॥आदौशुक्लःप्रवक्तव्यःकेचित्कृष्णोपिमासके॥१॥

अर्थ—शुक्ल प्रतिपदे पासून पूर्णिमे पर्यंत शुद्धपक्ष जाणावा. आणि वद्य प्रतिपदे पासून अमावास्ये पर्यंत कृष्णपक्ष. शुद्धपक्ष देवांचा आणि कृष्णपक्ष पितरांचा. भेद—शुक्लपंचमी पासून कृष्णपंचमी पर्यंत शुक्लपक्ष याच रीतीनें कृष्णपक्ष जाणावा. प्रथम शुक्लपक्ष नंतर कृष्णपक्ष तो अमांत मास होतो. प्रथम कृष्णपक्ष नंतर शुक्लपक्ष तो पूर्णिमांत मास होतो. हे दोन्ही पक्ष देशपरत्वे चालू आहेत.

## अधिक मास.

द्वात्रिंशद्भिर्गतैर्मासैर्दिनैःषोडशभिस्तथा ॥ घटि-
कानांचतुष्केनपतत्यधिकमासकः ॥ १ ॥

अर्थ—बत्तीस मास सोळा दिवस आणि च्यार घटिका इतके भोगल्यावर अधिक मासाचा संभव होतो.

## अधिक मास व क्षय मास.

असंक्रांतिमासोधिमासःस्फुटंस्याद्द्विसंक्रांतिमासः
क्षयाख्यःकदाचित् ॥ क्षयःकार्तिकादित्रयेनान्यतः
स्यात्तदावर्षमध्येधिमासद्वयंच ॥ १ ॥

अर्थ—ज्या महिन्यांत संक्रांत नाही तो अधिक मास, आणि ज्या महिन्यांत दोन संक्रांति येतात तो क्षयमास, तो कार्तिकादि तीन मासांत येतो; ते-

न्हां एक वर्षांत दोन अधिकमास येतात.

## सिद्धांतशिरोमणी.

गतोब्ध्यद्रिनंदैर्मितेशाककालेतिथीशैर्भविष्यत्यथांगाक्षसूर्यैः ॥ गजाद्यग्निभूभिस्तथाप्रायशोहंकुवेदेंदुवर्षैःक्वचिद्गोकुभिश्चेत् ॥ १ ॥

अर्थ— पूर्वी ज्या शकांत क्षयमास जाहला असेल त्या शका पासून १४१ वर्षांचे अंतरानें क्षयमास येतो आणि पुढें एकादे समयीं १९ वर्षांच्याआंत किंवा बाहेर क्षयमास येतो. यास मत्यंतर—९७४ चे शकांत क्षयमास भुक्त झाला आणि पुढें क्षयमास येणें तो १११५ । १२५६ । १३७८ शकांत होईल. आणि यापुढें १४१ । १९ वर्षांचे अंतरानें क्षयमास येईल याप्रमाणें जा०.

## तिथि प्रकरण.

मासभाच्चांद्रभंयावत्गणयेत्तावदेवतु ॥ यावंतिगणनाद्भानितावत्यस्तिथयःक्रमात् ॥ १ ॥

अर्थ— चैत्रादि मास १२ ज्या मासाचें नांव त्याच नांवाचें नक्षत्र तें मास नक्षत्र जाणावें. जसें—चैत्रास चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, पूर्वाषाढा, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, अश्विनी, कृत्तिका, मृग, पुष्य, मघा, पूर्वाफल्गुनी. या प्रकारें मासनक्षत्रें अनुक्रमें जाणावीं. त्या मास नक्षत्रां पासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजावें. जी संख्या येईल ती तिथि जाणावी, परंतु पूर्णिमांत मासा पासून मोजावें म्हणाजे गणित बरोबर येईल.

## तिथिसंज्ञापरिज्ञान.

प्रतिपत्सिद्धिदाप्रोक्ताद्वितीयाकार्यसाधिनी ॥ तृतीयारोग्यदात्रीचहानिदाचचतुर्थिका ॥ १ ॥ शुभातुपंचमीज्ञेयाषष्ठिकात्वशुभामता ॥ सप्तमीतुशुभाज्ञेया अष्टमीव्याधिनाशिनी ॥ २ ॥ मृत्युदात्रीतुनवमीद्रव्यदादशमीतथा ॥ एकादशीतुशुभदाद्वादशीसर्वसिद्धिदा ॥ ३ ॥ त्रयोदशीसर्वसिद्धाज्ञेयाचोग्राचतुर्दशी ॥ पुष्टिदापूर्णिमाज्ञेयात्वमावास्याशुभातिथिः ॥

४॥ ॥ स्वामी ॥ वन्हिर्विरिंचोगिरिजागणेशः फणि-
विशाखोदिनकृन्महेशः ॥ दुर्गांतकोविश्वहरी स्मर
श्चशर्वःशशीचेतिपुराणदृष्टिः ॥ १ ॥ अमायाः पित-
रः प्रोक्तास्तिथीनामधिपाः क्रमात् ॥ संज्ञा ॥ नंदाच
भद्राचजयाचरिक्तापूर्णेतिसर्वास्तिथयः क्रमात्स्युः ॥
कनिष्ठमध्येष्टफलाश्चशुक्लेकृष्णेभवंत्युत्तममध्यहीनाः
१ ॥ पालन ॥ कूष्मांडंबृहतीफलानिलवणंवर्ज्यंतिला-
म्लंतथातैलंचामलकंदिवंप्रवसतांशीर्षकपालांत्रकं ॥
निष्पावांश्चमसूरिकाफलमथोवृंताकसंज्ञंमधुद्यूतंस्त्री-
गमनंक्रमात्प्रतिपदादिष्वेवमाषोडश ॥ १ ॥

अर्थ—पुढें तपशीलवार कोष्टकांत लिहिल्याप्रमाणें:—

| तिथींचें फळ. | | | स्वामी. | संज्ञा. | | | तिथि पालन. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | तिथि. | फळ. | | नांव. | शुक्ल. | कृष्ण. | |
| १ | प्रतिपदा. | सिद्धि. | अग्नि. | नंदा. | अशुभ. | शुभ. | कोहळा. |
| २ | द्वितीया. | कार्यसाध. | ब्रम्हा. | भद्रा. | अशुभ. | शुभ. | डोरली. |
| ३ | तृतीया. | आरोग्य. | गौरी. | जया. | अशुभ. | शुभ. | लवण. |
| ४ | चतुर्थी. | हानि. | गणेश. | रिक्ता. | अशुभ. | शुभ. | तिल. |
| ५ | पंचमी. | शुभा. | अहि. | पूर्णा. | अशुभ. | शुभ. | आंबट. |
| ६ | षष्ठी. | अशुभा. | स्कंद. | नंदा. | मध्यम. | मध्यम. | तेल. |
| ७ | सप्तमी. | शुभा. | सूर्य. | भद्रा. | मध्यम. | मध्यम. | आंवळा, |
| ८ | अष्टमी. | व्याधिनाश | शिव. | जया. | मध्यम. | मध्यम. | नारळ. |
| ९ | नवमी. | मृत्यु. | दुर्गा. | रिक्ता. | मध्यम. | मध्यम. | भोंपळा. |
| १० | दशमी. | धनदा. | यम. | पूर्णा. | मध्यम. | मध्यम. | पडवळ. |
| ११ | एकादशी. | शुभा. | विश्वेदेव | नंदा. | शुभ. | अशुभ. | पावटे. |
| १२ | द्वादशी. | सर्वसिद्धा. | हरी. | भद्रा. | शुभ. | अशुभ. | मसूरा. |
| १३ | त्रयोदशी. | सर्वसिद्धा. | मदन. | जया. | शुभ. | अशुभ. | वांगें. |

| १४ | चतुर्दशी. | उग्रा. | शिव. | रिक्ता. | शुभ. | अशुभ. | मधु. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १५ | पौर्णिमा. | पुष्टि. | चंद्र. | पूर्णा. | शुभ. | ०० | घृत. |
| ३० | अमावास्या | अशुभ. | पितर. | पूर्णा. | ०० | अशुभ. | स्त्रीसंग. |

## नंदादितिथींस कोणतीं कार्यें करावीं तीं.

नंदासु चित्रोत्सववास्तुतंत्रक्षेत्रादिकुर्वीततथैवनृत्यं॥ विवाहभूषाशकटाध्वयानेभद्रासुकार्याण्यपिपौष्टिकानि ॥ १ ॥ जयासुसंग्रामबलोपयोगीकार्याणिसिद्ध्यंत्यपितिर्मितानि ॥ रिक्तासुविद्वद्वधघातसिद्धिर्विषादिशस्त्रादिचयातिसिद्धिं ॥ २ ॥ पूर्णासुमांगल्यविवाहयात्रासपौष्टिकंशांतिककर्मकार्यं ॥ सदैवदर्शेपितृकर्ममुक्त्वानान्यद्विदध्याच्छुभमंगलानि ॥ ३ ॥

अर्थ— नंदा म्हणजे प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या तिथींचे ठायीं आनंदादि कृत्यें, देवादिकांचे उत्साह, गृहसंबंधीं कृत्यें, स्थल नीटकरणें, घेणें, नृत्यसंबंधीं गीत, वाद्य इत्यादि कृत्यें करावीं. १ भद्रा म्हणजे द्वितीया, सप्तमी, द्वादशी या तिथीचे ठायीं विवाह, दागिने, गाडी, रथसंबंधीं कार्यें, मार्ग नीटकरणें, प्रयाण, पुष्टिक्रिया इत्यादि करावीं. २ जया म्हणजे ३।८।१३ या तिथीच्याठायी युद्ध करण्यास सिद्ध जें सैन्य त्याचे उपयोगीं तलवार, ध्वज इत्यादि कार्यें केली असतां सिद्ध होतात. ३ रिक्ता म्हणजे ४।९।१४ या तिथींच्या ठायीं विद्वानाचा नाश आणि घातकर्माचीसिद्धि, विषप्रयोग, शस्त्रप्रयोग इत्यादि उग्रकृत्यें करावी. ४ पूर्णा म्हणजे ५।१०।१५ या तिथींच्या ठायीं विवाहादि शुभकृत्यें, महायात्रा, शांतिक व पौष्टिक इत्यादि काय करावीं. ५ अमावास्येस पितृकार्य करावीं.

## अष्टदिशांचेस्वामी.

रविःशुक्रोमहीसूनुःस्वर्भानुर्भानुजोविधुः॥बुधोबृहस्पतिश्चैवदिशामीशास्तथाग्रहाः ॥ १ ॥

अर्थ—पूर्वेचा स्वामी रवि. १ आग्नेयीचा स्वामी शुक्र. २ दक्षिणेचा मंगळ. ३ नैर्ऋत्येचा राहु. ४ पश्चिमेचा शनि. ५ वायव्येचा चंद्र. ६ उत्तरेचा बुध. ७ आणि ईशान्येचा गुरु. ८ हे दिशांचे स्वामी व ग्रह जाणावे.

## ग्रहांचे वर्ण.

रक्तावागारकादित्यौश्वेतौशुक्रनिशाकरौ ॥ गुरुसौ-
म्यौपीतवर्णौशनिराव्हसितावुभौ ॥ १ ॥

अर्थ—अंगारक आणि सूर्य यांचा वर्ण तांबडा, शुक्र चंद्र यांचा वर्णश्वेत, गुरु, बुध यांचा वर्ण पिवळा, शनि, राहु, केतु यांचा वर्ण काळा आहे.

## ग्रहांचा जाती.

ब्राह्मणौजीवशुक्रौचक्षत्रियौभौमभास्करौ॥सोमसौ-
म्यौविशौप्रोक्तौराहुमंदौतथांत्यजौ ॥ १ ॥

अर्थ—गुरु, शुक्र हे ब्राह्मण. मंगळ, रवि हे क्षत्रिय. बुध, चंद्र हे वैश्य. राहु, केतु आणि शनि हे शूद्र होत.

## वारांवर कर्मे करावयाचीं तीं.

## रविवारीं.

राज्याभिषेकोत्सवयानसेवागोवन्हिमंत्रौषधशस्त्रक-
र्म ॥ सुवर्णताम्रौर्णिकचर्मकाष्ठंसंग्रामपण्यादिरवौ
विदध्यात् ॥ १ ॥

अर्थ—रविवारीं राज्याभिषेक करणें, गीत, वाद्य, पालखींत बसणें, राजसेवा, गाय, बैल इत्यादि आणणें व देणें, हवन, यज्ञादि मंत्रोपदेशदेणें व घेणें, औषध देणें व घेणें, शस्त्रें, सोनें व तांबें, शाली इत्यादि वस्त्रें, काष्ठें-युद्धप्रसंग, वाणीपणा ही कृत्यें करावीं,

## सोमवारीं.

शंखाब्जमुक्तारजतेक्षुभोज्यस्त्रीवृक्षकक्षांबुविभूष-
णाद्याः॥गीतंक्रतुक्षीरविकारश्रृंगीपुष्पांबरारंभ-
णमिंदुवारे ॥ १ ॥

अर्थ—सोमवारीं शंख, कमळें, मोतीं, रुपें, ऊंस, भोजन, स्त्रीभोग, झाडें, पर्वत, उदक, अलंकार, गायन, यज्ञादिक, गोरस, गायी, म्हशी, पुष्पें, वस्त्रें, इत्यादि कृत्यें करावी,

## भौमवारीं.

भेदानृतस्तेयविषाग्निशस्त्रवधाभिघाताहवशाठ्य दंभान् ॥ सेनानिवेशाकरधातुहेमप्रवालरक्तानि कुजेविदध्यात् ॥ १ ॥

अर्थ—भौमवारीं भेद करणें, अनृत, चोरी, विषप्रयोग, अग्नि, शस्त्रें, वध, नाश, संग्राम, कपट, दंभ, सैन्यांत प्रवेश, खाणी, धातु, सुवर्ण, प्रवाळ, रक्तस्राव हीं कृत्यें करावीं.

## बुधवारीं.

नैपुण्यपुण्याध्ययनंकलाश्चशिल्पादिसेवालिपिले- खनानि ॥ धातुक्रियाकांचनयुक्तिसंधिव्यायास वादादिबुधेविधेयं ॥ १ ॥

अर्थ—बुधवारीं चातुर्य, पुण्य, अध्ययन, कला, शिल्पशास्त्र, सेवा, लिहिणें, चित्रकाढणें, धातुक्रिया, सुवर्ण, युक्ति, सख्यत्व, जाणें, येणें, वाद करणें, ही कृत्यें करावीं,

## गुरुवारीं.

धर्मक्रियापौष्टिकयज्ञविद्यामांगल्यहेमांबरवेश्म यात्राः ॥ रथाश्वभैषज्यविभूषणादिकार्यंविदध्या त्सुरमंत्रिवारे ॥ १ ॥

अर्थ—गुरुवारीं धर्म करणें, नवग्रहादिपूजा, यज्ञ, विद्याभ्यास, सौभाग्य, वस्त्रें, घरकृत्यें, यात्रा, रथ, अश्व, औषधें, नगोटी हीं कृत्यें करावीं.

## शुक्रवारीं.

स्त्रीगीतशय्यामणिरत्नगंधवस्त्रोत्सवालंकरणानि कर्म ॥ भूपण्यगोकोशकृषिक्रियाश्चसिध्यंतिशुक्र स्यदिनेसमस्ताः ॥ १ ॥

अर्थ—शुक्रवारीं स्त्री, शय्या, गायन, मणी, रत्न, हिरे, गंध, वस्त्रें, उत्सा-

१, अलंकार, वाणिज्य, गायी, द्रव्य, भांडार, शेतकरणें, इत्यादि कृत्यें करावी-

## शनिवारीं.

लोहाश्मसीसत्रपुशस्त्रदासपापानृतस्तेयविषास-
वाद्यं ॥ गृहप्रवेशाद्विपबंधदीक्षास्थिरंचकर्मार्कसु
तेऽन्हिकुर्यात् ॥ १ ॥

अर्थ—शनिवारीं लोखंड, तिखें, पाषाण, शिसें, कथिल, तलवार, दास, पाप, अनृतभाषण, चोरी, विष, अर्ककाढणें, गृहप्रवेश, हत्तीबांधणें, उपदेशादिक हीं स्थिर कृत्यें करावीं.

## वारकोष्टक.

देवता ॥ ॥ सूर्यादितःशिवशिवागुहविष्णुकेंद्रकालाः
क्रमेणपतयःकथिताग्रहाणाम् ॥ वन्ह्यंबुभूमिहरिश-
क्रशचीविरिंचिस्तेषांपुनर्मुनिवरैराधिदेवताश्च ॥ १ ॥
॥ विचारकरण्यासकालपरिमाण ॥ ॥ पतंगसूनोर्दिव
साधिपत्यंनिशाप्यहश्चैवतुतिग्मभानोः ॥ रात्रिद्वयं
चैकदिनंचसोमेशेषग्रहाणामुदयप्रवृत्तिः ॥ २ ॥ दो-
षादोष ॥ ॥ नवारदोषाःप्रभवंतिरात्रौदेवेज्यदैत्येज्य
दिवाकराणाम् ॥ दिवाशशांकार्कजभूसुतानांसर्वत्र-
निंद्योबुधवारदोषः ॥ ३ ॥ कृत्यें ॥ ॥ सोमसौम्यगु
रुशुक्रवासराःसर्वकर्मसुभवंतिसिद्धिदाः ॥ भानुभौ-
मशनिवासरेषुचप्रोक्तमेवखलुकर्मसिध्यति ॥ ४ ॥ तै-
लाभ्यंगासशुभाशुभ ॥ ॥ रविस्तापंकांतिंवितरतिश
शीभूमितनयोमृतिंलक्ष्मींसौम्यःसुरपतिगुरुर्वित्तहर
णम् ॥ विपत्तिंदैत्यानांगुरुरखिलभोगानुगमनंनृणां-
तैलाभ्यंगात्सपदिकुरुतेसूर्यतनयः ॥ १ ॥ वस्त्रप-

रिधाना।जीर्णरवौसततमंबुभिरार्द्रमिंदौभौमेशुचेबुध-
दिनेचभवेद्धनाय ॥ ज्ञानायमंत्रिणिभृगौप्रियसंगमा-
यमंदेमलायचनवांबरधारणंस्यात् ॥ १ ॥ श्मश्रुक-
र्मासशुभाशुभ ॥ भानुर्मासंक्षपयतितथासप्तमार्तंड-
सूनुर्भौमश्चाष्टौवितरतिशुभंबोधनःपंचमासान् ॥
सप्तैवेंदुर्दशसुरगुरुः शुक्रएकादशेतिप्राहुर्गर्गप्रभृ-
तिमुनयः क्षौरकार्येषुनूनं ॥ १ ॥ विद्यारंभासशुभा-
शुभ ॥ विद्यारंभःसुरगुरुसितज्ञेष्वभीष्टार्थदायोक-
र्तुश्चायुश्चिरमपिकरोत्यंशुमान्मध्यमोत्र ॥ नीहारां-
शौभवतिजडतापंचताभूमिपुत्रेछायासूनावपिचमुन
यः कीर्तयंत्येवमाद्याः ॥ १ ॥

अर्थ—वारांचे कोष्टकांचीं घरें केली त्यांचीं नावें: वार त्यांचे स्वामीं म्हण-
जे पति ॥ २ ॥ देवता ॥ ३ ॥ विचार करण्यास काल परिमाण ॥ ४ ॥
दोषादोष ॥ ५ ॥ उक्तानुक्त कृत्यें ॥ ६ ॥ तैलाभ्यंग करण्यास शुभाशुभ ॥
७ ॥ नवें वस्त्र परिधान ॥ ८ ॥ श्मश्रु कर्मास शुभाशुभ ॥ ९ ॥ विद्यारंभास
शुभाशुभ ॥ १० ॥ याप्रमाणें नावें जाणावी.

| वारांचींनावें | रवि | सोम | भौम | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वारांचेपति | शिव | पार्वती | स्कंद | विष्णु | ब्रह्मा | इंद्र | काल |
| देवता | अग्नि | उदक | भूमी | हरी | इंद्र | इंद्राणी | ब्रह्मा |
| विचार कर-ण्यास का० | ८ प्रहर | २ रात्रि ४ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर |
| दोषादोष | दिन-दोष | रात्रि-दोष | रात्रि-दोष | सदा-दोष | दिन-दोष | दिन-दोष | रात्रि-दोष |
| उक्तानुक्तकृ० | उक्तकर्म-सिद्धी | सर्व कर्मसिद्धि | उक्तकर्मसिद्धि | कर्मसिद्धि | कर्मसि-द्धि | कर्मसिद्धि | उक्तकर्मसिद्धि |

| तैलाभ्यंग | ज्वरप्रद | कांतिप्रद | मृत्युप्रद | लक्ष्मीप्रद | वित्तनाश | विपत्तिप्रद | संपत्तिप्रद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वस्त्रपरि० | जीर्ण होते | ओलें राहील | शोकप्राप्ति | धनप्राप्ति | ज्ञानप्राप्ति | इष्टप्राप्ति | मळकट |
| श्मश्रुकर्मास शुभ | १ महिन्याचें आयु.ना | ७ महिने आयुष्य वृद्धि | ८ महिनें आयु. ना. | ९ महिने आयुष्य वृद्धि | १० महि. आयु. वृ. | ११ महि. आयुष्य-वृ० | ७ महिने आयु.ना. |
| विद्यारंभास शुभाशु. | मध्यम | जडत्व | मृत्यु | या तीन वारांस आयुष्याची वृ.व अभिष्टार्थ सि.जा० | | | मृत्यु |

## नक्षत्रपरिज्ञान.

द्विनिघ्नमासस्तिथियुक्विधूनोभशेषितःस्यादुडुशेषसंख्या १

अर्थ—चैत्रादि गतमास चालते मासासहित दुप्पट करावे आणि त्यांत गततिथी चालते दिवसासुद्धां मिळवाव्या. आणि एकत्र करून त्यांत एक वजा करावा. शेष राहील त्यास २७ नीं भागावें आणि जें शेष राहील तें नक्षत्र जाणावें.

## नक्षत्रसंज्ञापरिज्ञान.

अश्विनीशुभाप्रोक्ताभरणीनाशकारिणी ॥ कार्यघ्नीकृत्तिकाचोक्तारोहिणीसिद्धिदाबुधैः ॥१॥ मृगःशुभस्ततश्चार्द्रामध्यमस्तुपुनर्वसुः ॥ पुष्यःशुभःसार्पमघापूर्वाःशुक्नाशमृत्युदाः ॥२॥ उत्तराहस्तचित्रास्तुविद्यालक्ष्मीशुभप्रदाः॥ स्वातीविशाखेत्वशुभेमैत्रंसर्वार्थसिद्धिदम् ॥ ३ ॥ ज्येष्ठामूलक्रमात्तोयंक्षयनाशार्थहानिदम् ॥ विश्वब्रम्हाचविष्णुश्चबुद्धिवृद्धिसुखप्रदाः ॥ ४ ॥ वासववारुणंशैवंशुभंभद्रंमृतिप्रदम्॥ उत्तराभाद्रकंश्रीदंरेवतीकामदायिका॥ ५॥ ॥ इति

शुभाशुभनक्षत्राणि ॥ ॥ अथ नक्षत्रांचे स्वामी ॥
॥ भेशादस्त्रयमाग्निकेंदुगिरिशाःप्रोक्ताअदित्यंगिरः-
सर्पाःकव्यभुजोभगोऽर्यमरवित्वष्टासमीरःक्रमात्॥इं-
द्राग्नीत्वथमित्रइंद्रनिर्ऋतीनीरंचविश्वेविधिर्वैकुंठोव-
सुपाश्यजैकचरणाहिर्बुध्नचपूषाभिधाः॥ १ ॥ ॥ अ-
धोमुखनक्षत्रें ॥ ॥ मूलाग्नेयमघाद्विदैवभरणीसा-
र्पोणिपूर्वात्रयंज्योतिर्विद्भिरधोमुखंहिनवकंभानामिदं
कीर्तितम् ॥१ ॥ ॥ तिर्यङ्मुखनक्षत्रें ॥ ॥ ज्येष्ठा-
दित्यकराश्विनीमृगशिरःपौष्णानुराधानिलत्वष्ट्रा-
ख्यानिवदंतिभानिमुनयस्तिर्यङ्मुखानिक्रमात् ॥ २
ऊर्ध्वमुखनक्षत्रें ॥ पुष्यार्द्राश्रवणोत्तराशतभिषग्ब्रा-
ह्मश्रविष्टाव्हयान्यूर्ध्वास्यानिनवोदितानिमुनिभिर्धि-
ष्णान्यथैतेषुतु ॥३ ॥ ध्रुवनक्षत्रें ॥ १॥ रोहिणीस-
हितमुत्तरात्रयंकीर्तयंतिमुनयोध्रुवाव्हयम् ॥ ॥ मृ-
दुनक्षत्रें ॥ ॥ त्वाष्ट्रमित्रशशिपौष्णदेवतान्या-
मनंतिमुनयोमृदून्यथ २ ॥ लघुनक्षत्रें ॥ ॥ अ-
श्विनीगुरुभमर्कदैवतसाभिजिल्लघुचतुष्टयंमतम्॥४
तीक्ष्णनक्षत्रें ॥ ॥ मूलशक्रशिवसार्पदैवतान्युल्लप-
त्यथचतीक्ष्णसंज्ञया ॥५ ॥ चरनक्षत्रें ॥ वैष्णवत्रय-
ययुतःपुनर्वसुर्मारुतंचचरपंचकंत्विदम् ॥ ६ ॥ उग्र-
नक्षत्रें ॥ ॥ पूर्विकात्रितयमांतकंमघेत्युग्रपंचकमि-
दंजगुर्बुधाः ॥ ॥ मिश्रनक्षत्रें ॥ ॥ हव्यावाहमयु-
तंद्विदैवतंमिश्रसंज्ञमथमिश्रकर्मसु ॥ ॥ चरादिन-
क्षत्रें ॥ ॥ चरंचलंक्ररमुशंतिचोग्रंध्रुवंस्थिरंदारुण-

भंचतीक्ष्णं ॥ क्षिप्रंलघुत्वंमृदुमैत्रसंज्ञंसाधारणंमिश्र-
मितिब्रुवंति ॥ १ ॥॥ अंधादिनक्षसं० ॥ ॥ अंधकं-
तदनुमंदलोचनंमध्यलोचनमतः सुलोचनं ॥ रोहि-
णीप्रभृतिभंचतुष्टयंसाभिजिद्विगणयेत्पुनः पुनः ॥
१ ॥ ॥ नक्षत्रांचीआकृति ॥ ॥ तुरगमुखसदृक्षंयो-
निरूपंक्षुराभंशकटसममथैणास्योत्तमांगेनतुल्यम् ॥
मणिगृहशरचक्राभातिशालोपमंभंशयनसदृशमन्य
च्चात्रपर्यंकरूपं ॥१॥ हस्ताकारमतश्चमौक्तिसमंचा-
न्यत्प्रवालोपमंधिष्ण्यंतोरणवत्स्थितंवलिनिभंस-
त्कुंडलाभंपरम् ॥ क्रुध्यत्केसरिविक्रमेणसदृशंशय्या
समानंपरंचान्यद्दंतिविलासवत्स्थितमतः शृंगाटक-
व्यक्तिच ॥ २ ॥ त्रिविक्रमाभंचमृदंगरूपंवृत्तंततो-
न्यद्यमलद्वयाभम् ॥ पर्यंकरूपंमुरजानुकारिइत्येव-
मश्व्यादिभचक्ररूपं ॥ ३ ॥ ॥ नक्षत्रांच्याताऱ्यांची
संख्या ॥ वन्हित्रिऋत्विषुगुणेंदुकृताग्निभूतबाणा-
श्विनेत्रशरभूकुयुगाब्धिरामाः ॥ रुद्राब्धिरामगुणवे-
दशताद्वियुग्मदंतावुधैर्निगदिताः क्रमशोभितारा:॥१॥

कोष्टक.

| संख्या | नक्षत्रांची नावें. | शुभाशुभ संज्ञा. | स्वामीची नावें. | रुपनावें. | मुख्य संज्ञा. | संज्ञानावें. | लोचन संज्ञा. | स्वरूपाची आकृति. | ताऱ्यांची संख्या. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी. | शुभ. | आश्वि.कु. | तिर्य.मुख | लघु. | क्षिप्र | मंदलोच | अश्वमुख. | ३ |
| २ | भरणी. | नाशक. | यम. | अधोमुख | उग्र. | क्रूर. | मध्यलो. | योनिरूप. | ३ |
| ३ | कृतिका. | कार्यनाश | अग्नि. | अधोमुख | मिश्र. | साधारण | मलोचन | वस्त्र्या. | ६ |
| ४ | रोहिणी. | सिद्धि. | ब्रम्हा. | ऊर्ध्वमुख | ध्रुव. | स्थिर. | अंधलो० | शकटास. | ५ |
| ५ | मृगशीर्ष. | शुभ. | चंद्र. | तिर्य०मु. | मृदु. | मैत्र. | मंदलोच | मृगासम | ३ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | आर्द्रा. | शुभ. | शिव. | ऊर्ध्वमुख | तीक्ष्ण | दारुण. | मध्यलो० | मणिसम. | १ |
| ७ | पुनर्वसु. | मध्यम. | दवमाता. | तिर्यङ्मु. | चर. | चल. | सुलोचन. | गृहासम. | ४ |
| ८ | पुष्य. | शुभ. | गुरु. | ऊर्ध्वमुख | लघ. | क्षिप्र. | अधलो० | शरासम. | ३ |
| ९ | आश्लेषा. | शोक. | सर्प. | अधोमुख | तीक्ष्ण | दारुण. | मदलो० | चक्रासम. | ५ |
| १० | मघा. | नाशक. | पितर. | अधोमुख | उग्र. | क्रूर. | मध्यला. | शालास. | ५ |
| ११ | पूर्वा. | मृत्युपद. | भगः | अधोमुख | उग्र. | क्रूर. | सुलोचन. | शय्यासम | २ |
| १२ | उत्तरा. | विद्या. | अर्यमा. | ऊर्ध्वमुख | ध्रुव. | स्थिर. | अधलोच. | पर्यंकास. | २ |
| १३ | हस्त. | लक्ष्मी. | रवि. | तिर्यं०मु. | लघु. | क्षिप्र. | मदलोचन | हस्तासम. | ५ |
| १४ | चित्रा. | शुभदा. | त्वष्टा. | तिर्यं०मु. | मृदु. | मैत्र. | मध्यलो. | मौक्ति० | १ |
| १५ | स्वाती. | अशुभदा | वायु. | तिर्य०मु, | चर. | चल. | सुलोचन. | पोवळ्या. | १ |
| १६ | विशाखा. | अशुभ. | इंद्राग्नी | अधोमुख | मिश्र. | साधार. | अधलो० | तोरणास. | ४ |
| १७ | अनुराधा | सर्वसिद्धि | मित्र. | तिर्यं०मु. | मृदु. | मैत्र. | मदलोचन | बलीसम. | ४ |
| १८ | ज्येष्ठा. | क्षय. | इंद्र. | तिर्यं०मु. | तीक्ष्ण | दारुण. | मध्यलो. | कुंडलास. | ३ |
| १९ | मूळ. | नाशप्रद. | राक्षस. | अधोमुख | तीक्ष्ण | दारुण. | सुलोचन. | सिंहपु०. | ११ |
| २० | पूर्वाषाढा | अर्थहानि | उदक. | अधोमुख | उग्र | क्रूर. | अधलो. | शय्यास. | ४ |
| २१ | उत्तरा० | बुद्धिदा. | विश्वेदेव | ऊर्ध्वमुख | ध्रुव. | स्थिर. | मदलोचन | हस्तासम. | ३ |
| २२ | अभिजि. | वृद्धिदा. | ब्रम्हा. | सर्वतोमु० | लघु. | क्षिप्र. | मध्यलो. | कोल्हास | ० |
| २३ | श्रवण. | सुखदा. | विष्णू. | ऊर्ध्वमुख | चर. | चल. | सुलोचन. | वामनास. | ३ |
| २४ | धनिष्ठा. | शुभदा. | वसु. | ऊर्ध्वमुख | चर. | चल. | अधलो० | मृदगा० | ४ |
| २५ | शततार. | कल्याणी | वरुण. | ऊर्ध्वमुख | चर. | चल. | मदलोचन | वर्तुला०र | १०० |
| २६ | पूर्वाभाद्र. | मृत्युदा. | अजैक. | अधोमुख | उग्र. | क्रूर. | मध्यलो. | यमला० | २ |
| २७ | उत्तरा० | लक्ष्मी. | अहिर्बु. | ऊर्ध्वमुख | ध्रुव. | स्थिर. | सुलोचन. | पर्यंकास. | २ |
| २८ | रेवती. | कामदा. | पूषा. | तिर्यं०मु. | मृदु | मैत्र. | अंधलोच. | मृदंग | ३२ |

## कार्याकार्यविचार.

### अधोमुखनक्षत्रें.

**वापीकूपतडागगर्तपरिखाखातौनिधेरुंधतिक्षेपौ-**
**द्यूतबिलप्रवेशगणितारंभाःप्रसिद्ध्यंतिच ॥ १ ॥ ॥**

अर्थ—अधोमुख नक्षत्रें ह्मणजे ( मूळ, कृत्तिका, मघा, विशाखा, भरणी, आश्लेषा, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा या नक्षत्रावर विहीर,

कुवा, तलाव व डबकण, खाण, द्रव्य काढणें व पुरणें, घ।, बिळांत प्रवेश करणें गणितारंभ हीं कर्मे करावी

## तिर्यङ्मुखनक्षत्रें.

अश्वेभोष्ट्रलुलायरासभवृषोरभ्रादिदंष्ट्रीशुनांगं-
त्रीयंत्रहलप्रवाहगमनारंभाःप्रसिद्ध्यंतिच ॥ १ ॥

अर्थ—तिर्यङ्मुख नक्षत्रें म्हणजे ज्येष्ठा, पुनर्वसु, हस्त, अश्विनी, मृग, रेवती, अनुराधा, स्वाती, चित्रा या नक्षत्रांवर अश्व, हत्ती, उंठ टोणगा, गा-ढव, बैल, मेंढा, डुकर, कुत्रें, हीं घेणें, नांव पाण्यांत घालणें, बैलगाडी, यंत्र, नांगर धरणें, प्रवाह गमन ही कर्मे करावी.

## ऊर्ध्वमुखनक्षत्रें.

प्रासादध्वजघर्मवारणगृहप्रासादसत्तोरणछाया-
रामविधिर्हितोनरपतेःपट्टाभिषेकादिच ॥ १ ॥ ॥

अर्थ—ऊर्ध्वमुख म्हणजे पुष्य, आर्द्रा, श्रवण, उत्तराफाल्गुनी, उत्तरा-षाढा, उत्तराभाद्रपदा, शततारका, रोहिणी, धनिष्ठा या नक्षत्रांवर देवालयें, ध्वज, मंडप, घरें, कोट, भिंती, तोरणें, चांदवा, बाग बांधणें, व राज्याभि-षेक ही कृत्यें करावीं.

## ध्रुवनक्षत्रें.

बीजहर्म्यनगराभिषेचनारामशांतिषुहितंस्थिरेषुच॥

अर्थ—ध्रुव नक्षत्रें म्हणजे रोहिणी, उत्तराफाल्गुनी, उत्तराषाढा, उ-त्तराभाद्रपदा, या नक्षत्रांवर बीज पेरणें, नगरांत प्रवेश, राज्याभिषेक, बागा-ईत, शांतिकर्म इत्यादि कर्मांस हितकारक जाणावें.

## मृदुनक्षत्रें.

मित्रकार्यरतिभूषणांबरोद्गीतिमंगलविधानमेषुतु ॥

अर्थ—मृदु म्हणजे मृग, चित्रा, अनुराधा, रेवती या नक्षत्रांवर मित्र-कार्य, स्त्रीसंग, भूषणधारण, वस्त्रें, गायनादि नानाप्रकारचीं मंगलकार्यें करावीं.

## लघुनक्षत्रें.

पण्यभूषणकलारतौषधज्ञानशिल्पगमनेषुसिद्धिदं ॥

अर्थ—लघु नक्षत्रें म्हणजे अश्विनी, पुष्य, हस्त, अभिजित् या नक्ष-

त्रांवर वाणीपणा, भूषणें धारण करणें, कलाकुशलता, क्रीडाकरणें, औषधें घेणें, ज्ञानविद्या, सुतारपणा, प्रस्थान करणें ही कृत्यें करावीं. तीं शुभदायक होतील.

## तीक्ष्णनक्षत्रें.

भूतयक्षनिधिमंत्रसाधनंभेदबंधवधकर्मचात्रतु ॥ १ ॥

अर्थ—तीक्ष्ण नक्षत्रें म्हणजे आर्द्रा, आश्लेषा, ज्येष्ठा, मूळ, या नक्षत्रांवर भुतें, यक्षादिक यांच्या पीडेचें निवारण, द्रव्यकाढणें, मंत्रसाधन करणें, भितुर बंधन वध करणें हीं उक्त होत.

## चरनक्षत्रें.

दंतिवाजिखरमेषवाहनारामयानविधिषुप्रशस्यते ॥

अर्थ—चर नक्षत्रें म्हणजे पुनर्वसु, स्वाती, श्रवण धनिष्ठा, शततारका या नक्षत्रांवर हत्ती, घोडे, गाढव, मेंढा, नानाप्रकारची वाहनें, बागांत जाणें, पालखी, रथ यांत बसावयास व यांच्या कामांस उक्त होय.

## उग्रनक्षत्रें.

शाठ्यनाशविषघातबंधनोत्साहशस्त्रदहनादिषुस्मृतं॥

अर्थ—उग्र नक्षत्रें म्हणजे भरणी, मघा, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, यांवर शठत्व करणें, नाश, विष घालणें, बंधन, उत्साह, शस्त्र, जाळणें, ही कर्मे उक्त होत.

## वस्तु नष्ट झाली ती पाहावयाचा प्रकार.

## लोचन संज्ञा नक्षत्रांवरून.

अंधकेलभतेशीघ्रंमंदकेचदिनत्रयम् ॥ मध्यकेचचतुःषष्ठ्यानप्राप्नोतिसुलोचने ॥ १ ॥

अर्थ—अंधक नक्षत्रीं वस्तु नष्ट झाली तर लौकर सांपडेल. मंद नक्षत्रीं नष्ट झाली असतां तीन दिवसांनीं सांपडेल. मध्यलोचन नक्षत्रीं वस्तु नष्ट झाली असतां चवसष्ठ दिवसांनीं सांपडेल. सुलोचन नक्षत्रांवर जर नष्ट झाली तर सांपडणार नाहीं.

## वस्तु कोणते दिशेस आहे ती पहावयाचा प्रकार.

अंधकेपूर्वतोवस्तुमंदकेदक्षिणेतथा ॥ पश्चिमेम
ध्यनेत्रेचउत्तरेतुसुलोचने ॥ १ ॥ ॥

अर्थः—अंधक नक्षत्रीं वस्तू हरवली असतां पूर्वेस पहावी. मंदलोचनीं वस्तू नष्ट झाली तर दक्षिणेस पहावी. मध्यलोचनीं हरवली असतां पश्चिमेस पहावी. सुलोचनी सांडली असतां उत्तरेस पहावी.

अंधेसद्यः प्राप्यतेवस्तुनष्टंकष्टात्प्राप्यंमंदनेत्रेच
तद्वत् ॥ दूराच्छ्राव्यंमध्यनेत्रेनलभ्यंनश्रोतव्यं
नैवलभ्यंसुनेत्रे ॥ १ ॥

अर्थः—अंधनक्षत्रीं वस्तु सांडली असतां, लौकर सांपडेल. मंदलोचनीं वस्तु प्रयत्नें करून, मध्यलोचनीं वस्तु दूर गेली सांपडणार नाही. सुलोचनी वस्तु गेली असतां निश्चयपूर्वक सांपडणार नाही.

## नक्षत्रपरत्वें प्रश्न.

मघादिद्वयर्यमांतंचसमीपेवस्तुदृश्यते ॥ हस्तादि-
वसुपर्यंतमन्यहस्तेचदृश्यते ॥ १ ॥ शततारा-
द्यमांतंतुस्वगृहेवस्तुदृश्यते ॥ अग्न्यादिसार्पप-
र्यंतमदृष्टंदूरगंतथा ॥ २ ॥ ॥

अर्थः—मघादि उत्तराफाल्गुनी पर्यंत नक्षत्रीं जर वस्तु हरवली तर समीप सांपडेल, हस्तनक्षत्रांपासून धनिष्ठापर्यंत वस्तु सांडली असतां दुसऱ्याचे हातीं दृष्टीस पडेल. शततारकापासून भरणी नक्षत्रां पावेतों स्वगृहांत सांपडेल. कृतिकापासून आश्लेषापावेतों सांपडणार नाहीं.

तिथिवारंचनक्षत्रंप्रहरेणसमान्वितं ॥ वसुसंख्या
हतंचैवसप्तभिर्विभजेत्पुनः ॥ १ एकेनभूतलेद्र-
व्यंद्वयंचेद्भांडसंस्थितं ॥ तृतीयेजलमध्यस्थमं-
तरिक्षेचतुर्थके ॥ २ ॥ तुषस्थंपंचमेविंद्यात्षष्ठे
गोमयमध्यगम् ॥ सप्तमेभस्ममध्यस्थं इत्येतत्-
प्रश्नलक्षणम् ॥ ३ ॥

अर्थः—प्रश्नसमयींची तिथि वार आणि नक्षत्रं भुक्त झाली असतां

ळ तितकी योजून आणि प्रहर जो असेल तो त्यांत मिळवून सर्व एकत्र करून आठानीं गुणावें आणि सातानी भागावें शेष उरेल त्याचें फळ असें. १ उरला तर भूमीत वस्तु आहे. २ उरले तर भांड्यांत वस्तु आहे ३ उरले तर जलामध्यें आहे. ४ उरले तर अंतरिक्षीं आहे. ५ उरले असतां कोंड्यांत आहे. ६ उरले तर शेणांत आहे. ७ उरले तर भस्मांत आहे.

## मद्यारंभकरण्यास.

रौद्रेपैत्र्येवारुणेपौरुहूतेयाम्येसार्पेनैर्ऋतेचैवधिष्ण्ये ॥ पूर्वाख्येषुत्रिष्वपिश्रेष्ठउक्तोमद्यारंभः कालविद्भिःपुराणैः ॥ १ ॥

अर्थः---आर्द्रा, मघा, शततारका, ज्येष्ठा, भरणी, आश्लेषा, मूळ, तीन पूर्वा, या नक्षत्रांवर प्रथम मद्य काढणें हें उक्त आहे.

## नवीनवस्त्र धारण.

रोहिणीषुकरपंचकेश्विभेप्युत्तरेपिचपुनर्वसुद्वये ॥ रेवतीषुवसुदैवतेचभेनव्यवस्त्रपरिधानमिष्यते ॥ १

अर्थः---रोहिणी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, अश्विनी, तिन्ही उत्तरा, पुनर्वसू, पुष्य, रेवती, धनिष्ठा यांवर नवीन वस्त्रें धारण करावीं.

## मोत्यें सुवर्णमणि रक्तवस्त्र धारण.

नासत्यपौष्णवसुभेकरपंचकेचमार्तंडभौमगुरुमंत्रिशशांकवारे ॥ मुक्तासुवर्णमणिविद्रुमदंतशंखरक्तांबराणिविधृतानिभवंतिसिद्ध्यै ॥ १ ॥

अर्थः---अश्विनी, रेवती, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, या नक्षत्रांवर, आणि रवि, भौम, गुरु, शुक्र, सोम या वारांवर मोत्यें सुवर्ण, मणि, पोंवळीं, हस्तिदंताचे चुडे, नवे शंखाचीं पूजा करणें, तांबडी वस्त्रें धारण करणें या कृत्यांस शुभ होय.

## पुंसवनासनक्षत्रें.

श्रवणः सकरः पुनर्वसुर्निर्ऋतेर्भंचसपुष्यकोमृग ः ॥ रविभूसुतजीववासराः कथिताः पुंसवनादिकर्मसु १

अर्थः— श्रवण, हस्त, पुनर्वसु, मूळ, पुष्य, मृग, आणि रवि, भौम, गुरु, हे वार पुंसवनादिक कर्मास उक्त होत.

## कर्णवेध.

पौष्णवैष्णवकराश्विनिचित्रापुष्यवासवपुनर्वसुमैत्रेसें॥ द्वेहिश्रवणस्यच्चवेधोनिर्ह्युशंतिमुनयोहिशिशूनाम्॥१

अर्थः—रेवती, श्रवण, हस्त, अश्विनी. चित्रा, पुष्य. धनिष्ठा, पुनर्वसु अनुराधा. मृगशीर्ष यांवर कर्णवेध मुलांचा करावा.

## अन्नप्राशन.

रेवतीश्रुतिपुनर्वसुहस्तब्राम्ह्यतोम्रृगशिरद्वितयेच॥ त्र्युत्तरेषुगदितंहिनवान्नप्राशनंतुऋषिभिःपृथुकानाम् ॥ १ ॥

अर्थः—रेवती. श्रवण, पुनर्वसु, हस्त. रोहिणी, मृग, आर्द्रा, तिन्ही उत्तरा यांवर लहान मुलांस प्रथम अन्न प्राशन करवावें.

## श्मश्रुकर्म. ॥

पुष्येपौष्णेचाश्विनीष्वैंद्वेचशाक्रेहस्ताद्येत्रिकेभेष्वदित्याम् ॥ क्षौरंकार्यंवैष्णवाद्यत्रयेचमुक्त्वाभौमादित्यपातंगिवारान् ॥ १ ॥

अर्थः—श्मश्रु करविण्यास पुष्य, रेवती, अश्विनी, मृग, ज्येष्ठा. हस्त. चित्रा, स्वाती, पुनर्वसु, श्रवण धनिष्ठा, शततारका ही नक्षत्र उक्त होत. आणि भौम, रवि, शनि हे वार वर्ज करावे.

## दंतबंधन.

येषुयेषुप्रशंसंतिक्षुरकर्ममहर्षयः ॥ तेषुतेष्वेवशंसंतिनखदंतादिलेखनम् ॥ १ ॥

अर्थः—दंत बांधणें व नखें काढणें यांस जीं श्मश्रुकर्मास नक्षत्रें सांगितलीं आहेत त्यांजवर ही कृत्ये करावीं.

आज्ञयानरपतेर्द्विजन्मनांदाहकर्मम्रृतसूतकेषुच ॥ बंधमोक्षमखदीक्षणेषुचक्षौरमिष्टमखिलेषुपुष्टिदं ॥२

अर्थः—राजाची अथवा ब्राह्मणाची आज्ञा व क्रिया करण्याचे आधीं व सूतकाचे अंत्यदिनीं, बंदींतून सुटला ह्मणजे यज्ञाचे ठायीं; अवश्य श्मश्रुकर्म करावें, तें पुष्टिप्रद होईल.

ताराशुद्धंक्षौरंरविगुरुशुद्धाव्रतदीक्षा ॥ शुक्रवि-
शुद्धिर्यात्रायांसर्वशुद्धिःशशांकेन ॥ ३ ॥

अर्थः—श्मश्रुस नक्षत्र ताराशुद्धि, व्रतग्रहीं रवि गुरु शुद्धि, यात्रेस जाण्यास शुक्रशुद्धि, आणि सर्व कर्मास चंद्रशुद्धि पहावी.

## श्मश्रुकर्मास वर्ज्य.

भद्रापक्षांतरिक्ताव्रतादिनवसुभूश्राद्धषष्ठीषुरात्रौ
संध्यापातारभास्वत्शनिषुघटधनुःकर्ककन्याग-
तेर्के ॥ जन्मर्क्षेजन्ममासेसुरदिनयजनेभूषितो-
ग्रामयायीभुक्तोभ्यक्तोभिषिक्तःसमादिनरहितःश्म-
श्रुकार्यंनकुर्यात् ॥ १ ॥

अर्थः—कल्याणी, पूर्णिमा, अमावास्या, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, व्रतदिवस, अष्टमी, प्रतिपदा, श्राद्धदिवस, षष्ठीस, रात्रीस, संध्याकाळीं, व्यतीपातादिक दुष्ट योग, भौमवार, रविवार, शनिवार, कुंभ, धनु, कर्क, कन्या या चार राशीस सूर्य असतां, जन्मनक्षत्र आणि मास, हवनादि कर्म असेल ते दिवशीं, भोजन केल्यावर, अभ्यंगस्नान केलें असतां, मंगलाभिषेक झाल्यावर, स्त्री रजस्वला असतां, सम दिवस वर्जावा. आणि श्मश्रु करावी.

## मौंजीबंधनास.

सौम्येपौष्णेवैष्णवेवासवाख्येहस्तस्वातीत्वाष्ट्र-
पुष्याश्विभेषु ॥ ऋक्षेदित्यांमेखलाबंधमोक्षौसंस्म-
र्यैतनूनमाचार्यवर्यैः ॥ १ ॥

अर्थः—मृग, रेवती, श्रवण, धनिष्ठा, हस्त, स्वाती, चित्रा, पुष्य, अश्विनी, पुनर्वसु या नक्षत्रांवर मौंजीबंधन करावें. अथवा मौंजी सोडावी, हें प्रशस्त आहे.

## विवाहनक्षत्रें.

मूलमैत्रमृगरोहिणीकरैःपौष्णमारुतमघोत्तरान्वि-

तैः ॥ निर्विधाभिरुडुभिर्मृगीदृशांपाणिपीडनविधिर्विधीयते ॥ १ ॥

अर्थः—मूळ, अनुराधा, मृग, रोहिणी, हस्त, रेवती, स्वाती, मघा, तिन्ही उत्तरा, हीं नक्षत्रें विवाहास घ्यावीं हीं उक्त होत. परंतु पंच सप्त शलाका वेध यास नसेल तर.

## अग्निहोत्र घेण्यास.

प्राजापत्येपूषभेसद्विदैवेपुष्येज्येष्टास्वैंदवेकृतिकासु ॥ अग्न्याधानंह्युत्तराणांत्रयेपिश्रेष्ठंप्रोक्तंप्राक्तनैर्विप्रमुख्यैः ॥ १ ॥

अर्थः—रोहिणी, रेवती, विशाखा, पुष्य ज्येष्ठा, मृग, कृतिका, आणि तिन्हीं उत्तरा यांचे ठायीं प्रथम अग्निहोत्र घेण्यास आरंभ करावा.

## विद्याभ्यासकरण्यास नक्षत्रें.

मृगादिपंचस्वपिभेषुमूलेहस्तादिकेचत्रितयेश्विनीषु ॥ पूर्वात्रयेचश्रवणेचतद्वद्विद्यासमारंभमुशंतिसिध्यै ॥ १ ॥

अर्थः—मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मूळ, हस्त, चित्रा, स्वाती, अश्विनी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, श्रवण, या नक्षत्रांवर मुलांस प्रथम विद्याभ्यासास आरंभ करावा. सिद्धिहोय.

## औषध घेण्यास नक्षत्रें.

पौष्णद्वयेचादितिभद्वयेचहस्तत्रयेचश्रवणत्रयेच ॥ मैत्रेचमूलेचमृगेचशस्तंभैषज्यकर्मप्रवदंतिसद्यः ॥ १ ॥

अर्थः—रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अनुराधा, मूळ, मृग, यांजवर नवीन औषध घ्यावें.

## रोग उत्पन्न होतो त्याचें शुभाशुभ पहाणें.

स्वात्याश्लेषारौद्रपूर्वात्रयेषुशाक्रेभौमेसूर्यजेसूर्य-

वारे ॥ नंदारिक्तास्वेवरोगस्यवाप्तिर्मृत्युर्ज्ञेयः शंकरोरक्षितापि ॥ १ ॥

अर्थः—स्वाती, आश्लेषा, आर्द्रा, तिन्ही पूर्वा, ज्येष्ठा आणि भौम, शनि, रविवार; नंदातिथि म्हणजे प्रतीपदा, षष्ठी, एकादशी; रिक्तातिथी म्हणजे चतुर्थी, नवमी, चतुर्दशी यांवर रोग उत्पन्न झाला तर शंकराच्यानेंही रक्षण करवणार नाहीं.

## रोगमुक्ति होण्याचें प्रमाण.

त्याध्युत्पत्तिर्यस्यपौष्णेसमैत्रेप्राणत्राणंजायते तस्यकृच्छ्रात् ॥ वैश्वेसौम्येरोगमुक्तिस्तुमासाद्विंशत्यास्याद्वासराणां मघासु ॥ १ ॥

अर्थः—रोग उत्पन्न होईल त्या दिवशीं जर रेवती अथवा अनुराधा असल्यास प्राणांतकष्ट होईल. उत्तराषाढा अथवा मृग असले तर एकमास पीडा भोगावी लागेल. आणि मघा असल्यातर २० दिवस पीडा भोगील.

पक्षाद्धस्तेवासवेसद्विदैवेमूलाश्विन्योरग्निधिष्ण्ये नवाहात् ॥ याम्येत्वाष्ट्रेवैष्णवेवारुणेचनैरुज्यंस्यान्नूनमेकादशाहात् ॥ १ ॥ ॥ ॥

अर्थः—हस्त नक्षत्रीं रोग उत्पन्न झाला असतां १५ दिवस पीडा भोगील; आणि धनिष्ठा, विशाखा, मूळ, अश्विनी, कृत्तिका असल्या तर ९ दिवस पीडा भोगाल; भरणी, चित्रा, श्रवण, शततारका असल्या तर ११ दिवस पीडा भोगील.

आहिर्बुध्न्येतिष्यसंज्ञेसभाग्येप्राजापत्यादित्ययोः सप्तरात्रात् ॥ रोगान्मुक्तिर्जायतेमानवानांनिःसंदिग्धंजल्पितंगर्गमुख्यैः ॥ १ ॥

अर्थः—उत्तराभाद्रपदा, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, अभिजित्, पुनर्वसु या नक्षत्री रोग उत्पन्न झाला असतां ७ दिवसांनीं पीडा निःसंशयें करून जाईल. असें गर्ग ऋषि सांगतात.

## रोगमुक्तिस्नानास नक्षत्रें.

इंदोर्वारेभार्गवेचध्रुवेषुसार्पादित्यस्वातियुक्तेषुभे-

षु ॥ पित्र्येचांत्येचैवकुर्यात्कदाचिन्नैवस्नानंरोगमु-
क्तस्यजंतोः ॥ १ ॥

अर्थः—सोमवार, शुक्रवार, आणि ध्रुवनक्षत्रें ( रोहिणी तिन्हीं उत्तरा, ) आणि आश्लेषा, पुनर्वसु स्वाती हीं शुभ होत; आणि मघा रेवती यावर रोगमुक्त मनुष्यांनी स्नान करूं नये.

## रोगमुक्तिस्नानास लग्न पहाणें.

लग्नेचरेसूर्यकुजेज्यवारेरिक्तातिथौचंद्रबलेचहीने ॥
केंद्रत्रिकोणार्थगतेचपापेस्नानंहितंरोगविमुक्ति-
कानां ॥ १ ॥

अर्थः—चरलग्नें म्हणजे मेष, कर्क, तूळ, मकर, आणि रवि, भौम, गुरु हे वार आणि रिक्ता तिथी, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी हीं इतकी असावी. आणि चंद्रबळ नसावें; लग्नादि केंद्रस्थानीं ( १, ४, ७, १० ) त्रिकोण-स्थानीं ( ९,५ ) आणि द्वितीय स्थानीं पापग्रह असावे असें लग्न पाहून स्नान केलें तर आरोग्य होईल.

## लता औषधी व वृक्ष लावण्यास नक्षत्रें.

सावित्रातिष्याश्विनिवारुणानिमूलंविशाखाचमृ-
दुध्रुवाणि ॥ लतौषधीपादपरोपणेषुशुभानिभा-
निप्रतिपादितानि ॥ १ ॥

अर्थः—हस्त, पुष्य, अश्विनी, शततारका, मूळ, विशाखा, आणि मृदु-संज्ञक व ध्रुवसंज्ञक ही नक्षत्रें मागील कोष्टकांत लिहिलीं आहेत. ( पृष्ठांक १६ पहावें. ) या नक्षत्रांवर वेली औषधी व वृक्ष लावावे शुभ होत.

## कूपारंभास नक्षत्रें.

हस्तात्तिस्रोवासवंवारुणंचशैवंपैत्र्यंत्रीणिचैवोत्त-
राणि ॥ प्राजापत्यंचापिनक्षत्रमाहुः कूपारंभेश्रे-
ष्ठमाद्यामुनींद्राः ॥ १ ॥

अर्थः—हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्ठा. शततारका, आर्द्रा, मघा, तीन उ-त्तरा आणि रोहिणी या नक्षत्रांवर कूपारंभ करावा. असे ऋषि सांगतात.

## द्रव्य देणें व ठेवणें.

साधारणोग्रध्रुवदारुणाख्यैर्धिष्ण्यैर्यदत्रद्रविणंप्र-
मुक्तं ॥ हस्तेनविन्यस्तवसुप्रनष्टंनलभ्यतेतंनि-
यतंकदाचित् ॥ १ ॥

अर्थः—साधारण उग्र, ध्रुव आणि दारुण या संज्ञेचीं नक्षत्रें मागील को-
ष्टकांत लिहिलीं आहेत त्यांजवर दुसऱ्यास दिलेलें अथवा ठेविलेलें द्रव्य
लभ्य होणार नाहीं, आणि हरवलेली वस्तु सांपडणार नाहीं.

## हत्ती घेणें व आणणें.

हस्तेषुचित्रासुतथाश्विनीषुस्वातौचपुष्येचपुनर्व-
सौच ॥ प्रोक्तानिसर्वाण्यपिकुंजराणांकर्माणिग-
र्गप्रमुखैःशुभानि ॥ १ ॥

अर्थः—हस्त, चित्रा, अश्विनी, स्वाती, पुष्य आणि पुनर्वसु या नक्षत्रां-
वर हत्ती घेणें व देणें अलंकारेंकरून शृंगारणें हीं सकल कर्मे करावीं.

## घोडा घेणें व आणणें.

पुष्यश्रविष्ठाश्विनिसौम्यभेषुपौष्णानिलादित्य-
कराव्हयेषु ॥ सवारुणर्क्षेषुबुधैःस्मृतानिसर्वाणि-
कार्याणितुरंगमानां ॥ १ ॥

अर्थः—पुष्य, धनिष्ठा, अश्विनी, मृग, रेवती, स्वाती, पुनर्वसु, हस्त, श-
ततारका, या नक्षत्रीं अश्व घेणें व देणें व अलंकारें करून शृंगारणें इत्यादिक
सकल कार्ये करावीं.

## गवादि पशु आणणें व पोंहोंचविणें यांस वर्जन०

चित्रोत्तरावैष्णवरोहिणीषुचतुर्दशीदर्शदिवाष्टमी-
षु ॥ ग्रामप्रवेशंगमनंप्रदध्याद्धीमान्पशूनांनक-
दाचिदेव ॥ १ ॥

अर्थः—चित्रा, तिन्ही उत्तरा, श्रवण, रोहिणी, चतुर्दशी अमावास्या, दि-
वा, अष्टमी, यांचे ठायीं पशूंस बाहेर गावीं पाठवूं नये व आणूंही नये.

### गाई घेणें व विकणें यास वर्ज.

शुक्रवासवकरेषुविशाखापुष्यवारुणपुनर्वसुभे-
षु ॥ अश्विपूषमयुतेष्वविधेयोविक्रयक्रयविधिः
सुरभीणाम् ॥ १ ॥

अर्थः–ज्येष्ठा, विशाखा, हस्त, धनिष्ठा, पुष्य, शततारका, पुनर्वसु, अ-श्विनी, रेवती या नक्षत्रांचे ठायीं गाईचा क्रयविक्रय करूं नये.

### तृणकाष्ठादिकांचा संग्रह करणें.

वासवोत्तरदलादिपंचकेयाम्यदिग्गमनगेहगोप-
नम् ॥ प्रेतदाहतृणकाष्ठसंग्रहःशय्यकावितननं-
चवर्जयेत् ॥ १ ॥

अर्थः–धनिष्ठांचे उत्तरार्धापासून नक्षत्रें ५ यांचे ठायीं दक्षिणेस जाणें, गृह नीट करणें, प्रेत दाह, तृण व काष्ठें यांचा संग्रह आणि बाजा, पलंग आदिकरून विणणें हीं सकल कार्यें करावीं.

### नांगर धरण्यास नक्षत्रें.

मृदुध्रुवक्षिप्रचरेषुमूलंमघाविशाखासहितेषुभेषु ॥
हलप्रवाहंप्रथमंविदध्यान्नीरोगमुष्कान्वितसौरभेयैः॥१

अर्थः—मृदु, ध्रुव, क्षिप्र, चर, या संज्ञा,कोष्टकांतील घ्याव्या. आणि मूळ, मघा, विशाखा सहित नक्षत्रें यांजवर बैलास मुष्की घालून प्रथम नांगर धरावा.

### बीज पेरण्यास नक्षत्रें.

हस्ताश्विपुष्योत्तररोहिणीषुचित्रानुराधामृगरेव-
तीषु ॥ स्वातौधनिष्ठासुमघासुमूलेबीजोप्तिरुत्कृ-
ष्टफलप्रतिष्ठा ॥ १ ॥

अर्थः— हस्त, अश्विनी, पुष्य, तिन्ही उत्तरा, रोहिणी, चित्रा, अनुराधा, मृग, रेवती, स्वाती, धनिष्ठा, मघा, मूळ, या नक्षत्रांवर बीजें पेरावी. उक्त होत.

### सर्पदंशास वर्ज्य.

यः कृत्तिकामूलमघाविशाखासार्पांतकार्द्रासुभुजं-

गदष्टः ॥ सर्वेनतेयेनसुरक्षितोपिप्राप्नोतिमृत्यो-
र्वदनंमनुष्यः ॥ १ ॥

अर्थः—कृतिका, मूळ, मघा, विशाखा आश्लेषा, भरणी, आर्द्रा, या नक्षत्रांवर सर्पदंश जाहला असतां गरुड संरक्षण करीत असला तथापि तो मनुष्य मृत्यु पावेल.

## नृत्यारंभकरण्यास नक्षत्रें.

हस्तस्तिष्योवासवंचानुराधाज्येष्ठापौष्णंवारुणं-
चोत्तराच ॥ पूर्वाचार्यैः कीर्तितश्चंद्रवर्तिन्नृत्यारं-
भेशोभनोभस्यवर्गः ॥ १ ॥

अर्थः—हस्त, पुष्य, धनिष्ठा, अनुराधा, ज्येष्ठा, रेवती, शततारका, तीन उत्तरा आणि चंद्रानुकूल्य पाहून नृत्यारंभ करावा; असें ऋषींचें वाक्य आहे.

## राज्याभिषेकास नक्षत्रें.

मैत्रशाक्रकरपुष्यरोहिणीवैष्णवेषुतिसृषूत्तरासुच ॥
रेवतीमृगशिराश्विनीषुचक्ष्माभृतांसमभिषेकइ-
ष्यते ॥ १ ॥

अर्थः—अनुराधा, ज्येष्ठा, हस्त, पुष्य, रोहिणी, श्रवण, तीन उत्तरा, रेवती, मृग, अश्विनी या नक्षत्रांवर राजास प्रथम अभिषेक करावा.

## राजदर्शनास नक्षत्रें.

सौम्याश्वितिष्यश्रवणश्रविष्ठाहस्तध्रुवत्वाष्ट्रसुपूष-
भानि ॥ मैत्रेणयुक्तानिनरेश्वराणांविलोकनेभानि-
शुभप्रदानि ॥ १ ॥

अर्थः—मृग, अश्विनी, पुष्य, धनिष्ठा, हस्त, ध्रुवसंज्ञक, चित्रा, रेवती, अनुराधा, या नक्षत्रांवर राजाचें दर्शन घ्यावें शुभप्रद होय.

## द्वितीयेस चंद्रोदय होतो त्याची फलश्रुति.

रौद्राहियाम्यानिलवारुणेंद्राण्याह्नजघन्यानित-
थाब्दहंति ॥ ध्रुवद्विदैवादितिभानिनूनंसमानिशे

षाणिपुनर्मुनींद्रैः ॥ १ ॥ बृहत्सुधान्यंकुरुतेसम-
र्घंजघन्यधिष्ण्येभ्युदितोमहर्घं ॥ समेषुधिष्ण्ये-
षुसमंहिमांशुर्वदंतिसंदिग्धमिदंमहांतः ॥ २ ॥

अर्थः—आर्द्रा, आश्लेषा, भरणी, स्वाती, शततारका ज्येष्ठा हीं नक्षत्रें जघन्य होत. यांवर मासाचा आदिचंद्रोदय जाहला असतां धान्याचीमहर्घता होईल. ध्रुव ह्मणजे तीन उत्तरा, रोहिणी, पुनर्वसु. हीं नक्षत्रें बृहत् होत यांवर चंद्रोदय झाला तर धान्य सवंग होईल आणि शेष राहिलेलीं नक्षत्रें सम जाणावीं. यांजवर चंद्रोदय झाला तर धारण सम राहील.

## राशिपरत्वें चंद्रोदयाचें फल.

मीनेमेषोदितश्चंद्रःसततंदक्षिणोन्नतः ॥ शेषो-
न्नतश्चोत्तरायांसमलावृषकुंभयोः ॥ १ ॥ विदूरंतु-
समेचंद्रेदुर्भिक्षंदक्षिणोन्नते ॥ सुभिक्षंक्षेममारो-
ग्यमुत्तराश्रितचंद्रमाः ॥ २ ॥

अर्थ.—मीन अथवा मेष या राशींवर शुक्ल द्वितीयेचा चंद्रोदय झाला असतां चंद्राची उन्नता दक्षिणेस असते तेणेंकरून दुर्भिक्षता होईल. मिथुनादि मकरपर्यंत राशीच्या ठायीं चंद्रोदय झाला असतां उत्तरेस चंद्राची उन्नता असते तेणेंकरून सुभिक्ष, क्षेम आणि आरोग्यता अशीं फळें होतात. आणि वृषभ, कुंभ यांजवर चंद्रोदय झाला असतां चंद्राचें समत्व असतें तेणेंकरून राजाशी कलह विदूरता होते.

## पुष्य नक्षत्राचे गुणदोष.

सिंहोयथासर्वचतुष्पादानांतथैवपुष्योबलवानु-
डूनां ॥ चंद्रेविरुद्धेप्यथगोचरेपिसिध्यंतिकार्या-
णिकृतानिपुष्ये ॥ १ ॥

अर्थः—जसा चतुष्पदांमध्यें सिंह बलवान् असतो तसेंच नक्षत्रांमध्यें पुष्य नक्षत्र बलवान् होय. गोचरीचा चंद्र कनिष्ठ, चवथा, अठवा व बारावा असला तथापि पुष्य कार्यसिद्धि करितात.

ग्रहेणविद्धोप्यशुभान्वितोविरुद्धतारोपिविलोम-

गोपि ॥ करोत्यवश्यंसफलार्थसिद्धिंविहायपाणि-
ग्रहणंतुपुष्यः ॥ १ ॥

अर्थः—पुष्य ग्रहानें विद्ध अथवा अशुभ ग्रहयुक्त, विरुद्ध तारागत किंवा विलोम तारागत असतांही याचे ठायीं पाणिग्रहणावांचून केलेल्या सर्व कार्याची अर्थसिद्धि करितो.

### योगप्रकरण.

## प्रति दिवसाचा योग पाहण्याची पद्धति.

वाक्पतेरर्कनक्षत्रंश्रवणाच्चांद्रमेवच ॥ गणयेत्त-
द्युतिंकुर्याद्योगस्यादृक्षशेषतः ॥ १ ॥

अर्थः—पुष्यापासून चालते सूर्य नक्षत्रापावेतों नक्षत्रें मोजावीं व श्रवणापासून दिवस नक्षत्रापावेतों मोजावीं. नंतर दोन्हीं संख्या एकत्र करून २७ नीं भागावें. आणि शेष राहील तो योग जाणावा.

## योगांचीं नांवें.

विष्कंभःप्रीतिरायुष्मान्सौभाग्यःशोभनस्तथा ॥
अतिगंडःसुकर्माचधृतिःशूलस्तथैवच ॥ १ ॥
गंडोवृद्धिर्ध्रुवश्चैवव्याघातोहर्षणस्तथा ॥ वज्रं-
सिद्धिर्व्यतीपातोवरीयान्परिघःशिवः ॥ २ ॥सि-
द्धिःसाध्यःशुभःशुक्लोब्रह्मैंद्रोवैधृतिःक्रमात् ॥ स-
प्तविंशतियोगास्तुकुर्युर्नामसमंफलं ॥ ३ ॥

अर्थः—

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | विष्कंभ. | ८ | धृति. | १५ | वज्र. | २२ | साध्य. |
| २ | प्रीति. | ९ | शूल. | १६ | सिद्धि. | २३ | शुभ. |
| ३ | आयुष्मान्. | १० | गंड. | १७ | व्यतीपात. | २४ | शुक्ल. |
| ४ | सौभाग्य. | ११ | वृद्धि. | १८ | वरीयान्. | २५ | ब्रह्मा. |
| ५ | शोभन. | १२ | ध्रुव. | १९ | परिघ. | २६ | ऐंद्र. |
| ६ | अतिगंड. | १३ | व्याघात. | २० | शिव. | २७ | वैधृति. |
| ७ | सुकर्मा. | १४ | हर्षण. | २१ | सिद्धि. | ० | इति योगाः |

## योग घटिका वर्ज्य.

विरुद्धसंज्ञाइहयेचयोगास्तेषामनिष्टःखलुपादआ-
द्यः ॥ सवैधृतिस्तुव्यतिपातनामासर्वोप्यनिष्टः
परिघस्यचार्धं ॥ १ ॥ तिस्रस्तुयोगेप्रथमेचव-
ज्रेव्याघातसंज्ञेनवपंचशूले ॥ गंडेतिगंडेचषडे-
वनाड्यःशुभेषुकार्येषुविवर्जनीयाः ॥ २ ॥

अर्थः—या सत्तावीस योगांच्या नांवांप्रमाणें यांचीं फलें जाणावीं. आणि त्यामध्यें वाईट नांवाचे योग आहेत त्यांचे आद्यपाद टाकावे व व्यतीपात, वैधृति हे सकळ वर्जावे; परिघाचे पूर्वार्ध, विष्कंभाच्या आद्य ३ घटिका, वज्र ३ घटिका, व्याघात ९ घटिका, गंड ६ घटिका, अतिगंड ६ घटिका आणि शूल ५ घटिका याप्रमाणें वर्ज करून शुभ कार्यें करावीं.

## करण पाहण्याची रीति.

गततिथयोद्विनिघ्नाशुक्लप्रातिपदादितः ॥ संग-
ण्याःसप्तकृच्छेषाःकरणंस्याद्ब्दवादिकं ॥ १ ॥

अर्थः—शुक्ल प्रतिपदेपासून ज्या तिथींचीं करणें पाहिजेत तिच्या पूर्वतिथीपर्यंत जी तिथीसंख्या होईल ती दुप्पट करावी आणि सातांनीं भागावी शेष उरेल तें त्या तिथीचें करण जाणावें.प्रत्येक तिथींत दोन करणें भोगतात

## करण.

करणांचीं नांवें. ॥ ॥ बवाव्हयंबालवकौलवा-
ख्यंततोभवेत्तैतिलनामधेयं ॥ गराभिधानंवणि-
जंचविष्टिरित्याहुरार्याःकरणानिसप्त १ ॥ अंते
कृष्णचतुर्दश्यांशकुनीदर्शभागयोः ॥ ज्ञेयंचतु-
ष्पदंनागंकिंस्तुघ्नंप्रतिपद्दले॥ २ ॥ स्वामी ॥ इं-
द्रोब्रह्मामित्रनामार्यमाभूःश्रीःकीनाशश्चेतितिथ्य-
र्धनाथाः ॥ कल्युक्षाख्यैसर्पवायुस्तथैवयेचत्वार-
स्तेस्थिराणांचतुर्णां ॥ १ ॥ कृत्यें ॥ पौष्टिकंस्थि-

रशुभानिबवाख्येबालवेद्विजहितान्यपिकुर्यात् ॥ कौलवेप्रमदमित्रविधानंतैतिलेशुभगताश्रयकर्म ॥ १ ॥ गरेचबीजाश्रयकर्षणानिवाणिज्यकेस्थैर्यवणिक्क्रियाश्च ॥ नसिद्धिमायातिकृतंचविष्ट्यांविषारिघातादिषुतत्रसिद्धिः ॥ २ ॥ मंत्रौषधानिशकुनौतुसपौष्टिकानिगोविप्रराज्यपितृकर्मचतुष्पदेपि ॥ सौभाग्यदारुणधृतिध्रुवकर्मनागेकिंस्तुघ्ननाम्निनिखिलंशुभकर्मकार्यम् ॥ ३ ॥

अर्थः—

| शुक्लतिथि ६० | | | | कृष्णतिथि ६० | | | | नांवें. | स्वामी. | कृत्यें, |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पूर्वदळ. | | उत्तरद. | | पूर्वदळ. | | उत्तरद. | | | | |
| १ | स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | किस्तघ्न | वायु. | शुभ कार्यें करावीं. |
| ५ | १२ | १ | १९ | ४ | ११ | ७ | ० | बव. | इंद्र. | व्रतें उत्साह क० तळें दे० वां. |
| २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | ४ | ११ | बालव. | ब्रह्मा. | ब्राह्मणाचें हित करावें. |
| ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | कौलव. | मित्र. | उन्माद आणि मित्रत्व करावें |
| ३ | १० | ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | तैतिल. | सूर्य. | विवाहादि मंगळ कार्यें करावीं |
| ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | ९ | २ | गरज. | भूमि. | बीज पेरणें, नांगर धरणें. |
| ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | वणिज. | लक्ष्मी. | देवप्र. गृहवां. दुकान, घालणें |
| ८ | १९ | ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | विष्टि. | यम. | सकल कर्में वर्ज. परंतु विषअरिघात इत्या. क्रूर कर्में करावीं |
| स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | १४ | शकुनि. | कलि. | मंत्रोपदेश औ. अ. पू. करावीं |
| स्थिर. | | ० | ० | ३० | ० | ० | ० | चतुष्पाद | बैल. | गायी, ह्मशी, देणें घेणें राज्याभिषेक आ. मित्र कार्यें करावीं |
| स्थिर. | | ० | ० | ० | ० | ० | २० | नाग. | सर्प. | सौभाग्य कर्में, लढाईंत जाणें, धैर्य धरणें, विद्याभ्यास करणें |

कल्याणी.

तिथिमान ॥ ॥ कृष्णेअग्निदिशोरूर्ध्वंसप्तमीभूतयोरधः ॥ शुक्लेवेदेशयोरूर्ध्वंभद्राप्रागवसुपूर्णयोः ॥ १ ॥ मनुवसुमुनितिथिषुयुगदशशिवगुणसंख्यासुतिथिषुपूर्वात्याः ॥ आयातिविष्टिरेषापृष्ठेशुभदापुरस्त्वशुभा ॥२॥ ॥ शास्त्रार्थ ॥ ॥ दिवासर्पमुखीभद्रारात्रौभद्रातुवृश्चिकी ॥ सर्पस्यचमुखंत्याज्यंरात्रौपुच्छंपरित्यजेत् ॥ ३ ॥ रात्रिभद्रायदान्हिस्याद्दिवाभद्रायदानिशि ॥ नतत्रभद्रादोषःस्यात्सर्वकार्याणिसाधयेत् ॥ ४ ॥ ॥ शरीरभाग ॥ ॥ नाड्यस्त्तपंचवदनेऽथगलेलथैकावक्षोदशैकसहितानियतंचतस्रः ॥ नाभिःकटीषडथपुच्छलवाचतिस्रोविष्टेर्बुधैरभिहितोंगविभागएषः ॥ ॥ ५ ॥ ॥ स्थानफल ॥ ॥ मुखेकार्यध्वस्तिर्भवतिमरणंचाथगलकेधनेहानिर्वक्षस्यथकटितटेबुद्धिविलयः ॥ कलिर्नाभौदेशेविजयमथपुच्छेचजगदुः शरीरेभद्रयाः पृथगितिफलंपूर्वमुनयः ॥ ६ ॥ ॥ चंद्र ॥ ॥ मीनेमेषालिकर्केशशिनिनिवसतिः स्वर्गसंस्थापिविष्टिःकन्यायांतौलिसंस्थेधनुमिथुनगलेनागलोकेनिवासः ॥ कुंभेसिंहेवृषेवामकरमुपगतेराजतेमृत्युलोकेभद्राचंद्रप्रभावात्धिमकरतनयानोशुभालौकिकेस्यात् ॥ ७ ॥ ॥ फलें ॥ ॥ स्वर्गेभद्राभवेत्सौख्यंपातालेचधनागमः ॥ मृत्युलोकेयदाभद्राकार्यसि-

द्धिस्तदानहि ॥८॥ ॥ वारपरत्वें नांवें ॥ ॥ सोमेशुक्रेचकल्याणीशनौचैवतुवृश्चिकी ॥ गुरौपुण्यवतीज्ञेयाचान्यवारेषुभद्रिका ॥ ९ ॥

॥ अर्थः—॥

| तिथि. | शास्त्रार्थ. | घटी-संख्या | स्थानें. | फलें. | चंद्र. | स्थानें. | फलें | वार. | नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | यातिथींची ३० घटिका उत्तरा- | ३ | पुच्छ. | विजय | मीन. | स्वर्गी. | सौख्य. | सोम. | कल्याणी. |
| कृष्ण | र्धाची भद्रा तिचें नांव वृश्चिकी | | | | मेष. | | | | |
| १० | ही दिवसास | ६ | कटी. | बुद्धि. नाश | वृश्चि. | | | शुक्र. | |
| ४ | आलीतर तीन घटिका पुच्छ- | | | | कर्क. | | | | वृश्चिकी. |
| शुक्ल. | वर्जावें. मुख शुद्ध होय उत्त- | ४ | नाभी. | कलह | कन्या | पाताळीं. | धनप्राप्ति. | शनि | |
| ११ | रार्ध ह्मणजे रात्रि. | | | | तूळ. | | | | |
| ७ | या तिथींची ३० घटिका पूर्वा- | ११ | हृदय. | धनना | धन. | | | गुरु. | पुण्यवती. |
| कृष्ण | र्धाची भद्रा नांव सर्पिणी ही | | | | मिथु. | | | | |
| १४ | रात्रीस आली तर. | १ | गळा. | मरण. | कुंभ. | मृत्युलोकीं. | अशुभ. | रवि. | भद्रा. |
| ८ | ५ घटिका विध्वंसक मुख व- | | | | सिंह. | | | | |
| शुक्ल. | र्जावें पुढें पुच्छ शुभ होय. | ५ | मुख. | विध्वं. | वृष. | | | बुध. | भद्रा. |
| १५ | पूर्वार्ध ह्मणजे दिवस होय. | ३० | | | मकर. | | | भौम. | भद्रा. |

## विष्टीचें स्वरूप.

दैत्येंद्रैःसमरेऽमरेषुविजितेष्वीशःक्रुधादृष्टवान् स्वात्कायात्किलनिर्गताखरमुखीलांगूलिनीचक्रपात् ॥ विष्टिःसप्तभुजामृगेंद्रगलकाक्षामोदरीप्रेतगादैत्यघ्नीमुदितैःसुरैस्तुश्रवणप्रांतेनियुक्तातु सा ॥ १ ॥

अर्थः—दैत्य आणि देव या उभयतांच्या युद्धांत देवांचा पराभव होतो

असें शंकरानीं जाणून क्रोधातें पावून आपले शरीरापासून , कादिली ती अशी कीं, गर्दभमुखी, पुच्छवती, नांव विष्टि, सप्तभुज। गळा सिंहासारखा, उदर कृश, प्रेतावर बसलेली, आणि दैत्यांस मारणारी अशी देवांनीं कर्णप्रांतीं ठेविली जी कल्याणी ती प्रसिद्ध आहे ती जाणावी.

## संक्रांति.

वारपरत्वें नांवें ॥ घोरारवौध्वांक्ष्यमृतद्युतौच संक्रांतिरारेचमहोदरीस्यात् ॥ मंदाकिनीज्ञेचगुरौचनंदामिश्राभृगौराक्षसिचार्कपुत्रे ॥ १ ॥ ॥ नक्षत्रपरत्वेंनावें ॥ ॥ उग्रक्षिप्रचरेमैत्रध्रुवामिश्रास्व्यदारुणेः ॥ ऋक्षेःसंक्रातिरर्कस्यघोराद्याः क्रमशोभवेत् ॥ २ ॥ ॥ फल ॥ ॥ ध्वांक्षीवैश्यान्सुखयतिमहोदर्यलंचोरसार्थान्घोराशुद्रानथ नरपतीनेवमंदाकिनीच ॥ नंदाख्याचद्विजवरगणान्मिश्रकाख्यापशूंश्चचांडालानांप्रकृतिमखिलांराक्षसीसंज्ञिताच ॥ ३ ॥ कालपरत्वेंफलें ॥ ॥ पूर्वाण्हकालेन्नृपतिद्विजेंद्रान्मध्यांदिनेचाथविशोऽपराण्हे ॥ शूद्रान्रवावस्तमितेप्रदोषेपिशाचकान्रात्रिचरान्निशीथे ॥ नटादिकांश्चापररात्रिकालेप्रत्यूषकालेपशुपालकांश्च ॥ संक्रांतिरर्कस्यसमस्तलिंगान्प्रभातसंध्यासमयेनिहंति ॥ ४ ॥ ॥ दिशांसमुख ॥ ॥ अर्केशुक्रेमुखंपूर्वेसौम्येभौमेच दक्षिणे॥शनौचंद्रेमुखंपश्चात्गुरौचैवोत्तरामुखी॥५॥

अर्थः—वार नक्षत्र परत्वें संक्रांति पाहण्याचें कोष्टक पुढें लिहिलें आहे.

| वार | नक्षत्रें | नांवें. | फलश्रुतिचांग. | काळ. | फलश्रुति वाईट. | दिशागम. |
|---|---|---|---|---|---|---|
| रवि. | उग्र | घोर | शूद्रांस सुख. | पूर्वाण्ह. | विप्रास व राजास वाई. | पूर्वेस. |
| सोम | क्षिप्र. | ध्वांक्षी | वैश्यांस सुख. | मध्यान्ह. | वैश्यास वाईट. | पश्चिमेस. |
| भौम. | चर. | महोद | चोरास साह्य. | अपरांण्ह. | शूद्रास वाईट. | दक्षिणेस. |
| बुध. | मैत्र. | मंदा० | राजांस साह्य. | प्रदोष. | पिशाचांस वाईट. | दक्षिणे. |
| गुरु. | ध्रुव. | नंदा. | द्विजवरगणा. | मध्यरात्रि. | राक्षसांस वाईट. | उत्तरेस. |
| शुक्र. | मिश्र | मिश्रा. | पशूंस चांगली. | अपरात्रि. | नटांस वाईट. | पूर्वेस. |
| शनि. | दारुण | राक्ष० | चांडाळांस सुख. | पहांट सूर्योदय. | पशुपालक व नाटकी. | पश्चिमेस. |

## करणपरत्वें संक्राति.

स्थिति ॥ ॥ चतुष्पदेतैतिलनागयोश्चसुप्तोरविः संक्रमणंकरोति ॥ विद्याद्ववाख्येचगराव्हयेच सबालवाख्येस्थितएवविष्टौ ॥ १ ॥ किंस्तघ्ननाम्निशकुनौवणिकौलवाख्येचोर्ध्वस्थितस्यखलु संक्रमणंरवेः स्यात् ॥ फल ॥ धान्यार्घवृष्टिषुभवेत्क्रमशस्त्वनिष्टोमध्येष्टतोतिमुनयःप्रवदंति पूर्वें ॥ २ ॥ ॥ वाहने ॥ ॥ सिंहोव्याघ्रोवराहश्च गर्दभः कुंजरस्तथा ॥ महिषोघोटकः श्वाचछागोवृषभकुक्कुटौ ॥ ३ ॥ उपवाहने ॥ ॥ गजोवाजिर्वृषोमेषः खरोष्ट्रौकेसरीक्रमात् ॥ शार्दूलमहिषोव्याघ्रवानराश्चबवादितः ॥ ४ ॥ ॥ फल ॥ ॥ गजेलक्ष्मीवृषेस्थैर्येघोटकेवाहनेतथा ॥ सिंहे व्याघ्रेभयंप्रोक्तंसुभिक्षंगर्दभेशुनि ॥ ५ ॥ व

राह्वेवामिनीपीडाजायतेमेषवाहने ॥ महिषेचभ-
वेत्क्लेशः कुक्कुटेमृत्युरेवच ॥ ६ ॥ ॥ वस्त्र ॥ ॥
श्वेतपीतहरितंचपांडुरंरक्तश्यामस्मसितंबहुवर्णं ॥
कंबलोविवसनंघनवर्णान्यंशुकानिचबवादिषु
क्रमात् ॥ ७ ॥ ॥ आयुधं ॥ ॥ भुशुंडीचग-
दाखड्गंदंडकोदंडतोमरान् ॥ कुंतपाशांकुशा-
स्त्रंचबाणश्चैवायुधंबवात् ॥ ८ ॥ ॥ भोज-
नपात्रं ॥ ॥ सौवर्णराजतंताम्रंकांस्यंलोहंच-
खर्परं ॥ पत्रंवस्त्रंकरोभूमिःकास्यपात्रबवादितः ॥९॥
॥ भक्ष्यपदार्थ ॥ ॥ अन्नंचपायसंभक्ष्यंपक्वान्नं
चपयोदधि ॥ चित्रान्नंगुडमध्वाज्यंशर्करातुबवा-
दितः ॥ १० ॥ ॥ गंध ॥ ॥ कस्तुरीकुंकुमंचै-
वचंदनंमृत्तिकातथा ॥ गोरोचनमलक्तश्चहरिद्रा
चतथांजनम् ॥ ११ ॥ सिंदूरमगरुश्चैवकर्पूरश्च
बवादितः ॥ १२ ॥ ॥ जाति ॥ ॥ देवभूता-
हिविहगपशवोमृगएवच ॥ ब्रह्मक्षत्रियविट्शू-
द्रमिश्रजातिर्बवादितः ॥ १३ ॥ ॥ पुष्पं ॥
॥ पुन्नागजातीबकुलश्चकेतकीबिल्वस्तथार्कःकम-
लंचदूर्वा ॥ मल्लीतथापाटलिकाजपाचबवादिपु-
ष्पाणिचयोजयेत्तु ॥ १४ ॥ ॥ भूषणं ॥ ॥ नू-
पुरंकंकणंमुक्ताविद्रुमंमुकुटंमणिं ॥ गुंजावराटकं
नीलंगरुत्मंरुक्मकंबवात् ॥ १५ ॥ कंचुकी ॥
विचित्रपर्णांशुकभूर्जपात्रिकासितातथापोटलनी-
लवर्णा ॥ कृष्णाजिनंचर्मचवल्कपांडुराबवादित-

श्चैवतुकंचुकीस्यात् ॥ १६ ॥ वयः ॥ शिशुःकुमारीचगतालकायुवाप्रौढाप्रगल्भाथततश्चवृद्धा ॥ वंध्यातिवंध्याचसुतार्थिनीचप्रव्राजिकाचैवफलंशुभंबवात् ॥ १७ ॥

अर्थः—

| करणें. | बव. | बालव | कौलव | तैतिल | गर | वणि. | विष्टि | शकु. | चतु० | नाग | किंस्तु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थिति. | बसली. | बसली | उभी | निज० | बसली | उभी. | बसली | उभी | निज. | निज० | उभी |
| फळें. | मध्यम. | मध्यम | महर्घ | सवंग | मध्यम | महर्ग. | मध्यम | महर्ग | सवंग | सवंग | महर्घ |
| वाहनें. | सिंह. | व्याघ्र | डुकर | गाढव | हत्ती | रेडा. | घोडा. | कुत्रा | मेंढा | बैल | कोंब. |
| उपवाह. | गज. | घोडा. | बैल | मेंढा | गाढव | उंट | सिंह | शार्दू. | हैसा | व्याघ्र | वानर |
| फळें. | भीती. | भीती | स्व.पी | सुभिक्ष | लक्ष्मी | क्लेश | स्थैर्य | सुभि. | पीडा | स्थैर्य | अपमृ. |
| वस्त्र. | श्वेत. | पिवळे | हिरवें | पांडु० | तांबडें | नी.व. | काळें | चित्र. | चोंग. | दिगं० | घनव. |
| आयुधें. | भृशुंडी. | गदा | खड्ग | दंड | धनुष्य | तोमर | कुंत | पाश | अंकुश | अस्त्र | बाण |
| भोज.पा. | सोन्याचें. | रुप्या. | तां० | कांस्य | लोखं. | खापर | पान | वस्त्र | हस्त | भूमीव. | का.पा |
| भक्षण. | अन्न. | क्षीर | भ०प. | पक्का. | दुध | दहीं | खिच. | गुळ | मध | तूप | साखर |
| लेपन. | कस्तुरी. | केशर | चंदन | मृति० | गोरु० | अलि. | हळद | काज. | शेंदूर | अभरू | कापूर |
| जाति. | देव. | भूत | सर्प | पक्षि | पशु | मृग | ब्राह्म. | क्षत्रि. | वैश्य | शूद्र | मिश्र. |
| पुष्प. | उंडीण. | जाई | बकुळ | केत० | बेलपु | रुई | कमल | दूर्वा | मोगरा | पाडळी | जास्वं. |
| भूषणें. | तोरड्या. | कांक. | मोतीं | पोवळें | मुगुट | मणि | गुंजा | कवडी | नीळ | पाच | सुवर्ण |
| कंचुकी. | विचित्र व | पाना. | वस्त्रा. | भूर्जप | पांढ० | श्वेतर | निळी | कृ० | चर्म | वल्कल | पांडुर |
| वयः | बाल. | कुंवार | गताल | तरुणी | प्रौढ | प्रग० | वृध्दा | वांझ | अति. | पुत्रेच्छ. | संन्या. |

फलश्रुति.

वाहनादिबुधैर्ज्ञेयमथोक्रांतिविशेषतः ॥ वाहनादिकवस्तूनांसंक्रमात्तुविनाशता ॥ १ ॥

अर्थः—संक्रांति ज्या वाहनावर बसेल आणि ज्या ज्या वस्तु धारण करील त्यांचा नाश होईल असें जाणावें.

## मुहूर्त.

संक्रांति किती मुहूर्ती कोणत्या नक्षत्रीं होते तीं नक्षत्रें निरनिराळीं फलासह सांगतों.

संक्रांतौमूर्तिभेदाहरपवनयमेवारुणेसार्पऐंद्रेएषा पंचेंदुसंज्ञागुरुकरपितृभेचाग्निदस्रेचसौम्ये ॥ त्वाष्ट्रेमैत्रेचमूलेश्रुतिवसुचपुषात्रीणिपूर्वाखरामे ब्राह्मेदित्यद्विदैवेभवतिशरकृतान्युत्तरात्रीणिऋक्षं ॥ १ ॥ बाणवेदैःसमर्घस्यान्मध्यस्थंव्योमरामयोः ॥ मूर्तिःपंचदशेयातिदुर्भिक्षंचप्रजायते ॥ २॥

अर्थः—१५ मुहूर्त म्हणजे आर्द्रा, स्वाती भरणी, शततारका, आश्लेषा, ज्येष्ठा, या नक्षत्रांवर संक्रांति झाली तर प्रजेस दुर्भिक्षता जाणावी. ३० मुहूर्त म्हणजे पुष्य, हस्त, मघा, कृत्तिका, अश्विनी. मृग, चित्रा, अनुराधा, मूळ, श्रवण, धनिष्ठा, रेवती, आणि ३ पूर्वा या नक्षत्रांवर झाली असतां धारण मध्यम राहील असें जाणावें. ४५ मुहूर्त म्हणजे रोहिणी, पुनर्वसु, विशाखा आणि ३ उत्तरा या नक्षत्रीं झाली तर स्वस्तता जाणावी.

## दुसरा प्रकार.

पूर्वसंक्रांतिनक्षत्रात्परसंक्रांतिऋक्षकं ॥ द्वित्रिसंख्यासमर्घस्याच्चतुःपंचमहर्घता ॥ १ ॥

अर्थः—गतमासस्थ, संक्रांति दिन नक्षत्र आणि माससंक्रांति दिननक्षत्र यांचें अंतर २ अथवा तीन असें आलें तर स्वस्तता होईल. आणि ४ अथवा ५ नक्षत्रांचें अंतर आलें तर महर्घता होईल.

## धान्य घेणें.

संक्रांतिनाड्यस्तिथिवारऋक्षधान्याक्षरंवन्हिहरेत्तुभागं ॥ संक्रांतिनाड्योनवमिश्रिताश्चसप्ताह-

ताःपावकभाजिताश्च ॥ एकेसमर्घेद्वितयेचसाम्यं शून्येमहर्घंमुनयोवदंति ॥ १ ॥

अर्थः—संक्रांतीच्या घटिका आणि गततिथि, वार, नक्षत्रें, व धान्याचीं अक्षरें मोजून एकत्र करून तिहिनीं भागावीं असें एक मत आहे. व दुसऱ्या मतानें संक्रांति नाडी मोजून त्यांत नऊ मिळवावे आणि सातांनीं गुणून ३ नी भागाव्या. शेष उरेल त्याचें फळ. १ शेष राहिला तर धान्याची स्वस्तता असेल. २ शेष राहिले तर मध्यम असेल. पूर्ण शेष राहिल्यास महर्घता होईल असें जाणावें.

## नक्षत्रपरत्वें संक्रांतीची पीडा.

संक्रांत्यधरनक्षत्राद्गणयेज्जन्मभावधि ॥ त्रिकं षट्कंत्रिकंषट्कंत्रिकंषट्कंपुनः पुनः ॥ पंथाभो- गोव्यथावस्त्रंहानिश्चविपुलंधनं ॥ १ ॥ ॥ ॥

अर्थः—संक्रांतीचे अधर नक्षत्रापासून जन्म नक्षत्रापावेतों. मोजावयाची रीति. प्रथम ३ नक्षत्रें पंथा, पुढें ६ भोग, ३ व्यथा ६ वस्त्रं, ३ हानि, ६ बहु धन प्राप्ति या रीतीनें समजावें.

## जन्मर्क्षादिकांचें फळ.

यस्यजन्मभमासादौरविसंक्रमणंभवेत् ॥ तन्मा साभ्यंतरेतस्यवैरंक्लेशोधनक्षयः ॥ १ ॥ ॥ ॥

अर्थः—ज्याचे जन्मनक्षत्रीं संक्राति झाली असेल त्याचें वैर पडेल; जन्म मासांत झाली तर क्लेश होतील. आणि तिथीवर झाली असतां धनाचा क्षय जाणावा.

## संक्रांतीचें स्वरूप.

षष्टियोजनविस्तीर्णासंक्रांतिःपुरुषाकृतिः ॥ एकवक्त्रानवभुजालंबोष्ठीदीर्घनासिका ॥ १ ॥ पृष्टालोकाश्रमंत्येवगृहीत्वाखर्परंकरे ॥ एवंसंक्र- मणेयस्यफलं प्रोक्तंमनीषिभिः ॥ २ ॥ ॥ ॥ ॥

अर्थः—शरीर ६० योजनें लांब आणि रुंद, पुरुषाची आकृति, एक

मुखीं, नवभुजा, ओंठ लांब, नासिका लांब, मागें पाहते आणि हातांत खापर घेऊन भ्रमण करिते असें जाणावें.

## हातांत फळ.

मेषालिकर्केचतथैवरक्तंचापेचमीनेचतुलेचपीतं ॥ श्वेतंवृषेस्त्रीमिथुनेचचंद्रेकृष्णंचनक्रेचघटेचसिंहे ॥ १ ॥ रक्तेफलेभवेदुःखंश्वेतेचैवसुखं शुभं ॥ पीतेश्रीस्तुतथा प्रोक्ताश्यामेमृत्युर्नसंशयः ॥ २ ॥

अर्थः—मेष, वृश्चिक, कर्क, या राशींस चंद्र असतां संक्रांतीचा प्रवेश झाला तर तिचे हातांत आरक्त वर्णाचें फळ आहे तेणें करून प्रजेस दुःख प्राप्ति; धन, मीन, तूळ या राशिस पिवळे वर्णाचें फळ लक्ष्मीप्राप्ति; वृषभ, कन्या, मिथुन या राशींस शुभ्रवर्णाचें, सुख शुभ प्राप्ति, मकर, कुंभ, आणि सिंह या राशींस चंद्र असतां कृष्णवर्णाचें फळ तें मृत्युकारक होय. याप्रकारें राशि परत्वें फळें जाणावी.

## राशिपरत्वें चंद्र.

यादृशेनहिमरश्मिमालिनासंक्रमोभवतितिग्मरोचिषः ॥ तादृशंफलमवाप्नुयान्नरः साध्वसाध्वपि वशेनशीगतोः ॥ १

अर्थः—जसा चंद्र नेष्टस्थानी अथवा उत्तम स्थानीं असतां फळ देतो तसेंच चंद्रपरत्वें, संक्रांतीचें शुभाशुभ फल प्राप्त होतें.

## पुण्यकाळ.

पूर्वतोन्हिरविसंक्रमोयदिपुण्यकालघटिकास्तुषोडश ॥ अर्धरात्रिसमयादनंतरंसंक्रमेपरदिनेहि पुण्यकं ॥ १ ॥

अर्थ—संक्रांति दिवसास झाली तर सोळा घटी पूर्वी पुण्यकाळ आणि मध्यरात्री झाली तर दुसरे दिवशी पुण्यकाळ जाणावा.

## ग्रहण प्रकरण.

चंद्रग्रहणप्रवृति ॥ ॥ भानोः पंचदशोऽऽक्षेचंद्र-
मायदितिष्ठति ॥ पौर्णमास्यां निशाशेषेचंद्रग्रह-
णमादिशेत् ॥ १ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रापासून १९ वें चंद्रनक्षत्र आणि पूर्णिमा सरून रात्रि शेष राहिलतर त्या रात्रीस चंद्र ग्रहण येईल असें जाणावें.

## सूर्यग्रहण.

माघोनंग्रस्तनक्षत्रात्षोडशांयादिसूर्यभं ॥ आमा-
वास्या दिवाशेषेसूर्यग्रहणमादिशेत् ॥ १ ॥

अर्थः—सर्व महिन्यांचे अमावास्येस एक राशिस सूर्य आणि चंद्र येतात. परंतु ग्रहण कालीं एके नक्षत्रीं दिवसास येऊन अमावास्या सरून दिवस शेष राहिला असतां सूर्यग्रहण संधी होतो. त्या दिवशीं चंद्र नक्षत्रापासून सूर्यनक्षत्रापावेतों मोजून त्यांतून ११ काढून शेष सोळावें नक्षत्र आलें म्हणजे सूर्यग्रहण होतें.

## राशीपरत्वें शुभाशुभ फलें.

त्रिषट्दशायोपगतंनराणांशुभप्रदंस्याग्रहणंर-
वींद्वोः ॥ द्विसप्तनंदेषुचमध्यमंस्याच्छेषेष्वनिष्टं
मुनयोवदंति ॥ १ ॥

अर्थः—सूर्य ग्रहण अथवा चंद्र ग्रहण आपले राशीपासून ज्या राशीस होईल त्या राशी ३, ६, १०, ११ ह्या शुभ होत. २, ७, ९, ५ ह्या मध्यम आणि १, ४, ८, १२ ह्या राशी दुष्ट होत.

## दुसरा पक्ष.

ग्रासात्तृतीयोऽष्टमगश्चतुर्थस्तथायसंस्थःशुभदःस्व-
राशिः ॥ ग्रासाद्रविःपंचनवर्तुमध्यस्ततोधमोक्तश्च
बुधैश्चशेषः ॥ १ ॥

अर्थः—ज्या राशीस सूर्यग्रहण होईल त्या राशीपासून आपल्या राशीपावेतों मोजावें. ३, ८, ४, ११ या राशींतून आपली जन्मराशी आल्यास

उत्तम होय. ५, ९, ६ यांतून आल्यास मध्यम. आणि १, २, ७, १०, १२ यांतून आल्यास कनिष्ठ याप्रमाणें फळें जाणावीं.

## संस्कार.

### ऋतुप्रकरण शुभाशुभ फळें.

तिथेरेकगुणंप्रोक्तंनक्षत्रस्यचतुर्गणं ॥ वारस्यषड्गुणोज्ञेयोमासश्चाष्टगुणःस्मृतः ॥ वस्त्रंशतगुणंविद्याद्दर्शनेचततोधिकं ॥ २ ॥

अर्थः—तिथीचा गुण १, नक्षत्राचे गुण ४, वाराचे ६, मासाचे ८, वस्त्राचे १०० आणि जी विटाळ पाहते तिचे गुण सर्वांहून अधीक परंतु चांगला दिवस असला तर चांगले गुण आणि दुष्ट दिवस असला तर वाईट गुण जाणावे.

### मासफळ.

आर्तवेप्रथमेचैत्रेवैधव्यंजायतेध्रुवं ॥ वैशाखेधनवृद्धिःस्याज्ज्येष्ठेरोगान्विताभवेत् ॥ १ ॥ आषाढेमृतवत्साचश्रावणेधनसंयुता ॥ भाद्रेतुदुर्भगानारीआश्विनेधनधान्यभाक् ॥ २ ॥ कार्तिके धननाशाचमार्गशीर्षेबहुप्रजा ॥ पौषेचपुंश्चली नारीमाघेपुत्रवतीभवेत् ॥ ३ ॥ फाल्गुनेपुत्रसंपन्नाज्ञेयंमासफलंबुधैः ॥

अर्थः—चैत्रमासीं प्रथम ऋतू मास झाला असतां वैधव्य, वैशाख मासीं धन वृद्धि, ज्येष्ठ मासीं रोग मासी, आषाढ मासीं मृतप्रजा, श्रावण मासीं लक्ष्मीदायक, भाद्रपद मासीं दरिद्री, आश्विन मासीं धनधान्ययुक्त, कार्तिक मासीं धननाश, मार्गशीर्ष मासीं बहुप्रजा, पौष मासीं जारकर्म, माघ मासीं पुत्रवती, फाल्गुन मासीं पुत्रसंपन्ना याप्रमाणें जाणावें.

### तिथिफळें.

शुचिर्नारीप्रतिपदिद्वितीयायांतुदुःखिनी ॥ तृतीयायांपुत्रवतीचतुर्थ्यांविधवाभवेत् ॥ १ ॥ पं-

चम्यांचैवसौभाग्यंषष्ठ्यांकार्यविनाशिनी ॥ सप्त-
म्यांसुप्रजानारीचाष्टम्यांराक्षसीतथा ॥ २ ॥ न-
वम्यांविधवानारीदशम्यांसौख्यभोगिनी ॥ ए-
कादश्यांशुचिर्नारीद्वादश्यांमरणंध्रुवं ॥ ३ ॥ त्र-
योदश्यांशुभाप्रोक्ताचतुर्दश्यांपरान्विता ॥ पौर्ण-
मास्याममायांचशुभंचाशुभमेवच ॥ ४ ॥

अर्थः—प्रतिपदेस ऋतु प्राप्त झाला असतां शुचि, द्वितीयेस दुःख भोगणारी, तृतीयेस पुत्रवती, चतुर्थीस विधवा, पंचमीस सौभाग्यवती, षष्ठीस कार्यनाशिनी, सप्तमीस सुप्रजा प्रसूती, अष्टमीस राक्षसी, नवमीस विधवा, दशमीस सौख्य भोगिनी, एकादशीस शुचि, द्वादशीस मरण, त्रयोदशीस शुभ, चतुर्दशीस जारिणी, पूर्णिमेस शुभ व अमावास्येस अशुभ जाणावें.

## ग्रहण व संक्रांती यांचें फळ.

संक्रांत्यांग्रहणेचैववैरिणीचगतालका ॥

अर्थः—संक्रांतीवर ऋतुप्राप्त जाहला असतां वैरिणी आणि ग्रहणावर जाहला असतां विधवा असें जाणावें.

## वारफळ.

आदित्येविधवानारीसोमेचैवमृतप्रजा ॥ मंगले
आत्मघातीस्याद्बुधेकन्याप्रसूः स्मृता ॥ १ ॥
गुरुवारेसुतप्राप्तिः कन्यापुत्रायुताभृगौ ॥ मंदेच
पुंश्चलीनारी ज्ञेयंवारफलंशुभम् ॥ २ ॥

अर्थः—रविवारीं ऋतुप्राप्त झाला असतां विधवा, सोमवारीं मृतप्रजा, भौमवारीं आत्मघातिनी, बुधवारीं कन्याप्रसूति गुरुवारीं पुत्रप्रसूति, भृगुवारीं कन्यापुत्रप्रसूति आणि शनिवारीं जारिणी होईल असें जाणावें.

## नक्षत्रफळ.

अश्विन्यांसुभगानारीभरण्यांविधवाभवेत् ॥ कृ-
त्तिकायांच वंध्यास्याद्रोहिण्यांचारुभाषिणी ॥ १ ॥

मृगेदारिद्र्ययुक्तोक्ताचार्द्रायांक्रोधकारिणी ॥ पूनर्वसौपुत्रवतीपुष्येपुत्रधनेश्वरी ॥ २ ॥ आश्लेषायांभवेद्वंध्यामघायांचार्थसंयुता ॥ पूर्वायांचार्थयुक्ताचाथोत्तरायांसतीतथा ॥ ३ ॥ हस्तेपुत्रधनैर्युक्ताचित्रायामनुचारिणी ॥ स्वात्यान्यगर्भावयवाविशाखायांतुनिष्ठुरा ॥ ४ ॥ मैत्रेचदुर्भगानारीज्येष्ठायांविधवाभवेत् ॥ मूलेपतिव्रतासाध्वीपूषासौभाग्यभागिनी ॥ ५ ॥ उषाचार्थवती प्रोक्ताश्रवेसौभाग्यसंपदः ॥ धनिष्ठायांशुभानारीशतेभद्रान्वितावुधैः ॥ ६ ॥ पूभाचोक्ताकामिनीतुउभालक्ष्मीयुताशुभा ॥ रेवत्यांपतिरिक्तातु ज्ञेयंभानांफलंबुधैः ॥ ७ ॥

अर्थः—अश्विनी नक्षत्रावर प्रथम ऋतु मास झाला असतां शुभ, भरणीवर विधवा, कृतिकांवर वंध्या, रोहिणीवर प्रियभाषणी, मृगावर दरिद्री, आर्द्रांवर क्रोधी, पुनर्वसुंवर पुत्रप्राप्ति, पुष्यावर पुत्रधनवती, आश्लेषांवर वांझ, मघांवर अर्थ प्राप्ति, पूर्वांवर अर्थप्राप्ति, उत्तरांवर सती हस्तावर पुत्रधन प्राप्ति, चित्रांवर पतिमतानुरूप चालणारी, स्वातींवर अन्यगर्भा, विशाखांवर निष्ठुर, अनुराधांवर दुर्भगा ज्येष्ठांवर विधवा, मूळावर पतिव्रता, पूर्वापाढांवर लक्ष्मीदायक, श्रवणावर सौभाग्यसंपत्ती, धनिष्ठांवर शुभ, शततारकांवर कल्याण युक्ता, पूर्वाभाद्रपदांवर उत्तम भोग, उत्तराभाद्रपदांवर लक्ष्मी प्राप्ती, आणि रेवतीवर पतीवांचून राहील. असें जाणावें.

## योगफळ.

आद्यतौविधवानारी विष्कंभेचरजस्वला ॥ स्नेहः प्रीतौतुदंपत्योरायुष्मतिधनप्रदा ॥ १ ॥ सौभाग्येपुत्रयुक्तातुशोभनेमंगलान्विता ॥ अतिगंडेतुविधवासुकर्मणिसुशोभना ॥ २ ॥ धृतौ

संपत्तियुक्ताचशूलेरोगयुताभवेत् ॥ गंडेदुःखा-
न्वितानारीवृद्धौपुत्रान्विताभवेत् ॥ ३ ॥ ध्रुवे
तुशोभनानारीव्याघातेगर्भघातिनी ॥ हर्षणेहृ-
र्षयुक्तातुवज्रेचैवानपत्यता ॥ ४ ॥ सिद्धौपुत्रा-
न्वितानारीव्यतीपातेविभर्तृका ॥ मृतवत्साव-
रियसिपरिघेचाल्पजीविता ॥ ५ ॥ शिवेपुत्रव-
तीनारीसिद्धौशीघ्रफलान्विता ॥ साध्येधर्मपरा
नारीशुभेशुभगुणान्विता ॥ ६ ॥ शुक्लेशुभकरा
नारीब्रम्हणिस्वपतौरता ॥ ऐंद्रेदेवरताप्रोक्तावै-
धृत्यंवधृतास्मृतं ॥ ७ ॥

अर्थः—विष्कंभ योगावर ऋतु मास आहला असतां विधवा, प्रीति योगा-
वर उभयतांचा स्नेह, आयुष्यमान् योगावर धनप्राप्ति, सौभाग्यावर पुत्र-
प्राप्ती, शोभनावर मंगल, अतिगंडावर विधवा, सुकर्म्यावर शुभ, धृतीवर-
संपत्ती शूलावर रोगिणी, गंडावर दुःखान्विता, वृद्धीवर पुत्र प्राप्ती, ध्रुवावर
शुभ व्याघातावर गर्भघातका, हर्षणावर हर्षयुक्ता, वज्रावर वंध्या, सिद्धीवर
पुत्रान्विता, व्यतीपातावर पती वांचून असेल, वरियान् योगावर मृतप्रजा,
परिघावर अल्पजीवितवती, शिवयोगावर पुत्रवती, सिद्धीयोगावर शीघ्र
फलप्राप्ती, साध्यावर अधर्मी, शुभावर गुणयुक्त, शुक्लावर शुभकर्मी, ब्रह्म्यावर
स्वपतिरत, ऐंद्रावर देवाशीरत, वैधृति योगावर विधवा असें जाणावें.

## करणफळ.

बवेप्रोक्तातुवंध्यास्त्रीबालवेपुत्रसंपदा ॥ कौलवे
पुंश्चलीनारीतैतिलेचारुभाषिणी ॥ १ ॥ गरेच
गुणसंपन्नावणिजेपुत्रिणिस्मृता ॥ विष्टांचमृत-
वत्साचशकुनौकामपीडिता ॥ २ ॥ चतुष्पदेशु
शुभानारीनागेपुत्रवतीभवेत् ॥ किंस्तुघ्नेव्यभि-
चारीतुकरणानांशुभंफलम् ॥ ३ ॥

अर्थः—बव करणांवर ऋतु मास झाला असतां वंध्या, बालवावर पुत्र-

संपत्ति, कौलवावर वेश्या, तैतिलावर प्रियभाषिणी गरावर गुणसंपन्ना, वणिजावर पुत्रिणी, विष्टीवर मृतवत्सा, शकुनीवर कामातुर, चतुष्पादावर शुभा, नागावर पुत्रवती, किस्तुघ्नावर जारिणी; याप्रकारें करून करण फळें जाणावीं.

## राशिफळ.

जारिणीचैवमेषेस्याद्वृषभेसुखभोगिनी ॥ मिथुने धनयुक्ताकर्कटेदुःखिताबुधैः ॥ १ ॥ सिंहेपुत्रवतीनारीकन्यायांमानिनीशुभा ॥ तुलेविचक्षणानारीवृश्चिकेव्यभिचारिणी ॥ २ ॥ धनेपतिव्रताज्ञेयामांसहीनाचनक्रके ॥ कुंभेधनवतीज्ञेया मीनेचचपलाबुधैः ॥ ३ ॥

अर्थः– स्त्रीस प्रथम ऋतुप्राप्त होतो त्यां काली चंद्र मेषराशीवर असतां जारिणी, वृषभावर सुख भोगिनी, मिथुनावर धनयुक्ता, कर्कावर दुःखी, सिंहावर पुत्रवती, कन्येवर अभिमानी, तूलावर विचक्षणा, वृश्चिकावर जारिणी, धनावर पतिव्रता, मकरावर कृश, कुंभावर धनवती, मीनावर चपला असें जाणावें,

## होराफळ.

सूर्येचव्याधिसंयुक्ताचांद्रहोरेपतिव्रता ॥ कुजहोरेतुदौर्भाग्यंबुधहोरेतुपुत्रिणी ॥ १ ॥ जीवेसर्वसम्रद्धिः स्याद्भृगौसौभाग्यमेवच ॥ शनौसर्वविनाशःस्याद्धोरकस्यफलंबुधैः ॥ २ ॥

अर्थः—स्त्रीस प्रथम ऋतु प्राप्त होतो त्या कालीं सूर्याचा होरा असतां व्याधि, चंद्राचा होरा असलातर पतिव्रता, भौमाचा होरा असतां व्याधि दुर्भगा, बुधाचा होरा असलातर पुत्रिका, गुरूचा होरा सर्वसमृद्धि, शुक्राचा होरा सौभाग्य, शनीचा होरा असलातर सर्वविनाशिनी असें जाणावे.

## लग्नफळ.

मेषलग्नेदारिद्राचवृषभेधनसंयुता ॥ कामिनीमिथुनेलग्नेकर्कटेपतिनाशिका ॥ १ ॥ सिंहेपुत्रप्र-

सूतिश्चपतियुक्ताखिलग्नके ॥ तुलेचैवांधतादा-
यीवृश्चिकेदद्रुदुःखिनी ॥ २ ॥ धनलग्नेधनैश्व-
र्यंमकरेकर्कशाभवेत् ॥ कुंभेवंशद्वयघ्नीच मीने
सर्वगुणान्विता ॥ ३ ॥

अर्थः—जी चालती संक्रांत असेल तेंच प्रथम लग्न सूर्योदयीं जाणावें याप्रमाणें अहोरात्रात बारा लग्ने होतात. मेषलग्नीं ऋतुप्राप्त झाला असतां दरिद्रता, वृषभ लग्नीं धनयुक्ता, मिथुनी कामिनी, कर्की पतिनाशका, सिंहिं पुत्रप्रसूति, कन्यालग्नीं पतियुक्ता, तूळीं अंधतादायी, वृश्चिकीं दद्रुदुःखिनी, धनी धनैश्वर्यवती, मकरीं कर्कशा, कुंभीं वंशद्वय नाशिनी मीनलग्नी गुणयुक्ता याप्रमाणें लग्नफळें जाणावीं.

## ग्रहांचफळें.

लग्नेराहुश्चसौरिश्चरविचंद्रौतथैवच ॥ तदासा
विधवा नारीसर्वसौभाग्यवर्जिता ॥ १ ॥

अर्थः—ज्या लग्नी स्त्रियांस प्रथम ऋतु प्राप्त होतो त्यालग्नीं राहु अथवा शनि अथवा रवि किंवा चंद्र ह्या चार ग्रहांतून एकग्रह जरीं असला तथापि त्या स्त्रीस वैधव्य प्राप्त होईल.

## रक्तफळ.

शोणितंबिंदुमात्रेणस्वैरिणीचाल्पशोणिता ॥ र-
क्तेरक्तेभवेत्पुत्रोकृष्णेचैवमृतप्रजा ॥ १ ॥ पि-
च्छलीचभवेद्वंध्याकाकवंध्याचपांडुरे ॥ पीते
दुश्चारिणीज्ञेयासुभगागुंजसादृशे ॥ २ ॥ सिं-
दूरवर्णेरक्तेतुकन्यासंततिरेवच ॥ ३ ॥

अर्थः—प्रथम ऋतु प्राप्त होतो त्यासमयीं त्या ऋतूचें बिंदुमात्र अल्पत्व असलें तर त्याचें फल स्वैरिणी, तांबडा असल्यास पुत्रवती, काळा असल्यास मृतप्रजा, पिच्छिलरस वांझ, पांढरा असल्यास काक वंध्या, पिवळ्यास दुराचारिणी, गुंजेसारिखा असल्यास सुभगा, सिंदूरवर्ण असल्यास कन्या संतति याप्रकारें करून फलश्रुति जाणावी.

## काळफळ.

पूर्वाण्हेसुभगाप्रोक्तामध्यान्हेचैवनिर्धना ॥ परा-
ण्हेत्वशुभाचैवसायान्हेसर्वभोगिनी ॥ १ ॥ सं-
ध्ययोरुभयोर्वेश्यानिशीथेविधवाभवेत् ॥ पूर्वरा-
त्रेतथावंध्यादुर्भगासर्वसंधिषु ॥ २ ॥

अर्थः—प्रथम ऋतु पूर्वाण्ह काळीं प्राप्त झाला असतां सुभगा, माध्यान्ह काळीं प्राप्त झाला असतां निर्धना, तिसरे प्रहराचें फळ शुभ, सायंकाळाचें फळ सर्व भोगिनी, उभय संधीस वेश्या, मध्यरात्रीस विधवा, पूर्व रात्रीस वांझ, सर्व संधीस दुर्भगा अशीं फळें जाणावीं.

## नेसलेल्या वस्त्राचें फळ.

सुभगाश्वेतवस्त्राचरोगिणीरक्तवस्त्रका ॥ नीलां-
बरधरानारीविधवापुष्पवत्यपि ॥ १ ॥ भोगि-
नीपीतवस्त्राचमिश्रवस्त्रावरप्रिया ॥ सूक्ष्मास्या-
त्सूक्ष्मवस्त्राचदृढवस्त्रापतिव्रता ॥ २ ॥ दुर्भगा
जीर्णवस्त्राचसुभगामध्यवाससा ॥ धूतवस्त्राशु-
भानारीमलिनेमलिनीभवेत् ॥ ३ ॥

अर्थः—प्रथम ऋतु प्राप्त होतो ते समयीं नेसलेलें वस्त्र पांढरें असेल तर सुभगा, तांबड्यावर रोगिणी, निळ्यावर विधवा, पिवळ्यावर भोगिनी, मिश्रवर्णावर पतिप्रिया, बारीक वस्त्र असल्यास शरीर कृश, बळकट वस्त्रावर पतिव्रता, जुन्या फाटक्यावर दुर्भगा, मध्यमावर सुभगा, धुतलेल्या वस्त्रावर शुभ, मळकट वस्त्र असल्यास मलीन फळ जाणावें.

## गर्भाधानास मुहूर्त.

ऋतौतुप्रथमेकार्यंपुन्नक्षत्रेशुभेदिने ॥ मघामूलां-
त्यपक्षांतमुक्त्वाचंद्रबलेसति ॥ १ ॥

अर्थः—प्रथम ऋतु प्राप्त झाल्यावर पुन्नक्षत्रीं शुभ दिवशीं मघा, मूळ, रेवती व अमावास्या, पूर्णिमा वर्ज करून उक्त चंद्रबळ पाहून मुहूर्त योजावा.

## ऋतूंच्या षोडश रात्रींचें शुभाशुभ फळ.

ऋतुःस्वाभाविकस्त्रीणांरात्रयःषोडशस्मृताः ॥
तासामाद्याश्चतस्त्रस्तुनिंदितैकादशीचया ॥ १ ॥
त्रयोदशीचशेषास्युःप्रशस्तादशवासराः ॥ त-
स्मात्रिरात्रंचांडालींपुष्पितांपरिवर्जयेत् ॥ २ ॥

अर्थः—ऋतु प्राप्त झाल्यापासून स्वभावें करून स्त्रीचे ठायीं सोळा रात्री असतो. त्यामध्यें प्रथम ३ रात्री पुष्पवती चांडाली सम होय, आणि चौथी, अकरावी, तेरावी ह्या निंदित वर्ज करून शेष १० रात्री प्रशस्त होत.

रात्रौचतुर्थ्यांपुत्रःस्यादल्पायुर्धनवर्जितः ॥ पंच-
म्यांपुत्रिणीनारीषष्ठ्यांपुत्रस्तुमध्यमः ॥ ३ ॥ स-
प्तम्यामप्रजायोषिदष्टम्यामीश्वरःपुमान् ॥ नव-
म्यांसुभगानारीदशम्यांप्रवरःसुतः ॥ ४ ॥ ए-
कादश्यामधर्म्यःस्यात्द्वादश्यांपुरुषोत्तमः ॥ त्र-
योदश्यांसुतापापावर्णसंकरकारिणी ॥ ५ ॥ ध-
र्मज्ञश्चकृतज्ञश्चआत्मवेदीदृढव्रतः ॥ प्रजायते
चतुर्दश्यांपंचदश्यांपतिव्रता ॥ ६ ॥ आश्रयः
सर्वभूतानांषोडश्यांजायतेपुमान् ॥ ७ ॥

अर्थः—चौथे रात्रीस स्त्रीसंग केला असतां अल्पायुषी, आणि धन-वर्जित असा पुत्र होतो, पंचम रात्रीस कन्या, षष्ठ रात्रीस मध्यम पुत्र, सप्तम रात्रीस अपत्य होणार नाहीं, ८ रात्रीस ईश्वर भक्त, ९ रात्रीस सौभाग्य स्त्री, १० रात्रीस गुणवान् पुत्र, ११ रात्रीस अधार्मिक पुत्र, १२ रात्रीस उत्तम पुरुष, १३ रात्रीस पापकर्मी वर्णसंकर करणारी कन्या, १४ रात्रीस धर्म, कृतज्ञता जाणणारा आणि आत्मवेत्ता व दृढ व्रत करणारा असा पुत्र होईल. १५ वे रात्रीस पतिव्रता, १६ वे रात्रीस सर्व भूतांस आश्रय देणारा असा पुत्र होईल.

## तिथी व वार मु०

षष्ठ्यष्टमीपंचदशीचतुर्थीचतुर्दशीमप्युभयत्रहि-

त्वा ॥ शेषाःशुभाःस्युस्तिथयोनिषेकेवाराःशशां-
केज्यसितेंदुजाश्च ॥ १ ॥

अर्थः—षष्ठी, अष्टमी, पूर्णिमा, अमावास्या, चतुर्थी आणि चतुर्दशी ह्या तिथी वर्ज करून शेष तिथी शुभ होत. आणि सोम, गुरु, शुक्र, बुध यांचे वार शुभ जाणावे.

## नक्षत्रफळ.

विष्णुप्रजेश्वरसमित्रसमीरपोष्णमूलोत्तरावरुण
भानिनिषेककार्ये ॥ पूज्यानिपुष्यवसुशीतकरा-
श्विचित्रादित्याश्चमध्यमफलाविफलाःस्युरन्ये ॥१॥

अर्थः—श्रवण रोहिणी, अनुराधा स्वाती, रेवती, मूळ तीन उत्तरा, शततारका हीं नक्षत्रें उत्तम होत. पुष्य, धनिष्ठा, मृग अश्विनी, चित्रा, पुनर्वसु, हीं मध्यम आणि अन्य राहिलेलीं कनिष्ट होत.

## मुहूर्त मार्तंडमतें.

स्वर्क्षीप्राङ्निट्चतुष्कासमदिनविवरश्राद्धत-
त्प्राकूदिनानित्यक्त्वामूलंमघांत्येवसुकलिजनि-
भाह्यनिपर्वाणिचतौ ॥ याहींज्यार्केंदुलग्नेविषम-
भलवगैरुब्दलैर्भोसुतार्थिन्व्यस्तैरेतैरिहैवायुग-
ह्निमुदितःकन्येच्छोसुचंद्रे ॥ १ ॥

वैधृति, संक्रांति महापातादि दुष्टयोग, श्राद्धांत पूर्व दिवस, जन्मनक्षत्रादि संधि दिवस, रात्रि नक्षत्र, इत्यादि वर्ज करून ज्या-लग्नीं विषम स्थानां राशिनवाशीं उचीचा-बृहस्पति अथवा सूर्य, चंद्र असेल तें लग्न घ्यावें ह्मणजे पुत्रप्राप्ती आणि हेंच ग्रह समराशीस असले तर कन्या प्राप्ति होईल.

## प्रथमगर्भिणीचे पुंसवनादिसंस्कार.

मूलादित्रितयेकरेश्रवणकेभाद्रद्वयार्द्रात्रयेरेवत्या
मृगपंचकेदिनकरेभौमेनरिक्तातिथौ ॥ नेत्रेमा-
स्यथवाग्निमासिधनुषिस्त्रीमीनयोश्चस्थिरेलग्ने
पुंसवनंतथैवशुभदंसीमंतकर्माष्टमे ॥

अर्थः—मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, हस्त श्रवण, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग आणि रवि भौम हे वार उक्त आणि रिक्ता तिथी वर्ज करून गर्भ धारण झाल्यापासून द्वितीय अथवा तृतीय हे मास आणि धन, कन्या, मीन हीं लग्नें व स्थिर लग्नें पुंसवनास उक्त होत. आणि हीच लग्नें सीमंतकर्मास अष्टम मासीं घेण्यास उक्त होत.

## वारफळे.

मृत्युश्चसौरेतनुहानिरिंदोः प्रजाम्रुतिःपुंवसनेबुधस्य ॥ काकीचवंध्याभवतीहशुक्रेस्त्रीपुत्रलाभो रविभौमजीवे ॥ १ ॥

अर्थः—शनिवारीं पुंसवन केलें असतां मृत्यु, इंदुवारीं शरीराचा नाश, बुधवारीं शिशु मरेल, शुक्रवारीं काकवंध्या ह्मणजे एकवार प्रसूति. रवि, भौम, गुरु, यावारीं पुत्रलाभ होईल. परंतु चंद्रानुकूल्य पाहून दुष्ट योगादिक वर्ज करून वर सांगितलेल्या उक्त नक्षत्रादि शुभदिनी पुंसवन ( पुरुषाकृति गर्भ व्हावा ह्मणून पुंसवन नामक संस्कार करितात. ) करावें ॥ अनवलोभनस्याप्ययमेव कालः ॥ याच मुहूर्तावर गर्भाचि स्थिरता व्हावी म्हणून अनवलोभन उक्त होय.

## अन्यमत.

## सीमंतोन्नयन आणि विष्णुबली.

चतुर्थषष्ठाष्टममासभाजिसौरेणगर्भेप्रथमंविधेयं ॥ सीमंतकर्मद्विजभामिनीनांमासेष्टमेविष्णुबलिंच कुर्यात् ॥ १ ॥

अर्थः—प्रथम गर्भ धारण झाल्यापासून चौथा, साहावा, अठवा असे सममास सौरमानें करून घ्यावें. सीमंत कर्म आणि अष्टममासीं विष्णु बली हीं ब्राह्मण स्त्रियांस उक्त होत.

सीमंतेतिष्यहस्तादितिहरिशशभृत्पौष्णविष्णुत्तराख्यापक्षाच्छिद्राचरिक्तापितृतिथिमपहायापराः स्युः प्रशस्ताः ॥ १ ॥

अर्थः—सीमंत कर्मास नक्षत्रें पुष्य, हस्त, पुनर्वसु, श्रवण, मृग, रेवती,

रोहिणी, तीन उत्तरा, हीं शुभ होत. पक्षच्छिद्रातिथि, रिक्ता आणि पितृतिथि वर्ज करून शेष राहिलेल्या तिथि शुभ जाणाव्या.

## पक्षच्छिद्रातिथि.

चतुर्दशीचतुर्थीच अष्टमीनवमीतथा ॥ षष्ठीच द्वादशीचैवपक्षच्छिद्राव्हयाः स्मृताः ॥ १ ॥ क्रमादेतासुतिथिषुवर्जनीयाश्चनाडिकाः ॥ भूताष्टामनुतत्वांकदशशेषास्तुशोभनाः ॥ २ ॥

अर्थः—चतुर्दशीच्या १४ घटिका प्रथम वर्जाव्या. चतुर्थीच्या ८ अष्टमीच्या १४, नवमीच्या २४ षष्ठीच्या ९ द्वादशीच्या १० अशा घटिका टाकून शेष तिथि उक्त होत.

## गर्भिणीधर्म.

भूम्यांचैवोच्चनीचायामारोहणवरोहणे ॥ नदीप्रतरणं चैवशकटारोहणंतथा ॥ १ ॥ उग्रौषधं तथाक्षारंमैथुनं भारवाहनं ॥ कृतेपुंसवनेचैव गर्भिणीपरिवर्जयेत् ॥ २ ॥

अर्थः—पुंसवन झाल्यावर गर्भिणी स्त्रीनें उंच, नीच भूमीवर चढणें, उतरणें, फार चालणें, झाडावर चढणें, वाहते नदींत जाणें, गाड्यावर बसणें, तीक्ष्ण औषधें घेणें, खारट पदार्थ खाणें, मैथुन करणें हीं कृत्यें वर्जावीं.

## गर्भिणी प्रश्न.

नामाक्षराणित्रिगुणीकृतानितुरंगदेशौतिथिमिश्रितानि ॥ अष्टौचभागंलभतेचशेषंसमेचकन्या विषमेचपुत्रः ॥ १ ॥

अर्थः—गर्भिणीचीं नामाक्षरें त्रिगुणित करून त्यांत घोड्याचीं नामाक्षरें व देशाचीं अक्षरें व चालती तिथी मिळवून सर्व संख्येस ८ नी भागावें शेष अंक सम उरले तर कन्या होईल. व विषम उरले तर पुत्र होईल.

## प्रसूतिस्थानीं प्रवेशास नक्षत्रें.

रोहिण्यैंदवपौष्णेपुस्वातीवारुणयोरपि ॥ पुनर्व-

सौपुष्यहस्तधनिष्ठान्युत्तरासुच ॥ १ ॥ मैत्रत्वा-ष्ट्रेतथाश्विन्यांसूतिकागारवेशनं ॥ प्रसूतिसंभवे कालेसद्यएवप्रवेशयेत् ॥ २ ॥

अर्थः—रोहिणी, मृग, रेवती स्वाती, शततारका पुनर्वसु, पुष्य, हस्त, धनिष्ठा, तीन उत्तरा, अनुराधा, चित्रा, अश्विनी, हीं नक्षत्रें प्रसूतिकागार प्रवेशाल उक्त होत. किंवा प्रसूतिसमय प्राप्त झाला असतां तत्कालीच प्रवेश करावा नक्षत्र विचार करूं नये.

## प्रसूतिसमयीं खोलींतील पदार्थ सांगाव-याचा प्रश्न.

मीनेमेषेस्त्रियौद्वेचचतस्त्रोवृषकुंभयोः ॥ तूळाक-न्यकयोःसप्तबाणाख्याधनकर्कयोः ॥ १ ॥ अन्य-लग्नेभवेत्तिस्त्रएवंज्ञेयंविचक्षणैः ॥ यत्रराहुस्त-त्रशय्याभौमेखट्वांगंभगता ॥ २ ॥ रविस्थानेभ-वेद्दीपःशनिस्थानेतुनालकं ॥

अर्थः—मीन अथवा मेष या लग्नीं प्रसूति झाली तर तिचेजवळ दोन स्त्रिया आहेत, वृषभ, कुंभ, या लग्नीं चार स्त्रिया; तूळ, कन्या या लग्नीं सात स्त्रिया; धन, कर्क, या लग्नीं पांच स्त्रिया, आणि अन्य लग्नीं तीन स्त्रिया जाणाव्या. लग्न कुंडली मांडून ज्या दिशेस राहू त्या दिशेस शय्या, भौम लग्नीं असला तर खड्ग मोडकी ज्या स्थानी रवि असेल त्या स्थानीं दीप आणि ज्या स्थानीं शनि असेल त्या स्थानीं मुलाचें नाळ असें जाणावें.

## तिथिगंडांत.

पूर्णानंदाख्ययोस्तिथ्योः संधिर्नाडिद्वयंतथा ॥ गंडांतंमृत्युदंजन्मयात्रोद्वाहव्रतादिषु ॥ १ ॥

अर्थः—पूर्णिमेची अंत्य घटिका आणि प्रतिपदेची आद्य घटिका अशी दोहोंची संधी; याच क्रमानें पंचमी, षष्ठी, दशमी एकादशी ह्या संधीच्या दोन दोन घटिका वर्जाव्या, यास तिथिगंडांत ह्मणावें.

## लग्नगंडांत.

कुलीरसिंहयोःकीटचापयोर्मीनमेषयोः ॥ गंडां-
तमंतरालंस्याद्घटिकार्धंमृतिप्रदं ॥ १ ॥

अर्थः-कर्क, सिंह या दोन लग्नाची संधि अर्ध अर्ध घटिका याच क्रमानें वृश्चिक आणि धन, मीन आणि मेष यांची संधी वर्ज्य करावी. ती एक घटिका मृत्युप्रद जाणावी.

## नक्षत्र गंडांत.

पौष्णाश्विन्योःसार्पपित्र्यर्क्षयोश्चयस्याज्ज्येष्ठामू-
लयोरंतरालम् ॥ तद्गंडांतंस्याच्चतुर्नाडिकंहियात्रा
जन्मोद्वाहकालेष्वनिष्टम् ॥ १ ॥

अर्थः—रेवती, अश्विनी यांच्या संधीच्या दोन दोन घटिका याच, क्रमानें आश्लेषा आणि मघा, ज्येष्ठा आणि मूळ अशा संधीच्या चार चार घटिका वर्जाव्या. असें हें त्रिविध गंडांत ( ह्मणजे वर सांगितलेली तिथी, लग्न, नक्षत्रात्मक तीन गंडांतें यांस त्रिविध गंडांत ह्मणावें. ) हें यात्रेस जाण्यास व जन्म वेळीं व विवाहास वर्जावें.

## जन्म कालाचीं शुभाशुभ फळें.

अश्विनीपितृमूलानांपूर्वार्धेबाध्यतेपितुः ॥ पूषा-
त्यशक्रपश्चार्द्धेजननींबाध्यतोशिशोः ॥ १ ॥ सर्वे-
षांगंडजातानांपरित्यगोविधीयते ॥ वर्जयेद्दर्शनं
शावंतच्चषाण्मासिकंभवेत् ॥ २ ॥

अर्थः—अश्विनी, मघा, मूळ या नक्षत्रांच्या पूर्वार्धी जन्म झालें तर बापास वाईट; रेवती, ज्येष्ठा, ह्या दोन नक्षत्रांच्या उत्तरार्धीं जन्म झाल्यास मातेस वाईट; आणि गंडांतीं जन्म झाल्यास मुलाचा त्याग करावा. अथवा ६ महिने पर्यंत मुख पाहूं नये.

## कृष्ण चतुर्दशीचें फळ.

कृष्णपक्षेचतुर्दश्यांप्रसूतेःषट्विधंफलं ॥ चतुर्द-

शींचषड्भागांकुर्यादाद्योशुभंस्मृतं ॥ १ ॥ द्विती-
येपितरंहंतितृतीयेमातरंतथा ॥ चतुर्थेमातुलं
हंतिपंचमेवंशनाशनं ॥ षष्ठेचधनहानिःस्यादा-
त्मनोवंशनाशनं ॥ २ ॥

अर्थः—कृष्ण चतुर्दशीस जन्म झाल्यास तिथीचे ६ भाग करावे. त्यांचीं फळें:—प्रथम भाग १० घटिकांचा शुभ, द्वितीय पित्यास वाईट, तृतीय मातेस वाईट, चतुर्थ मातुळास, पांचवा वंशास साहावा धन आणि आत्मवंश नाशक असें जाणावें.

## अमावास्येचें फळ.

सिनीवाल्यांप्रसूताश्चदासीभार्यापशुस्तथा ॥ ग-
जाश्वमहिषीश्चैवशक्रस्यापिश्रियंहरेत् ॥ १ ॥कु-
हूप्रसूतिरत्यर्थंसर्वदोषकरीस्मृता ॥ यस्यप्रसूति
रेतेषांतस्यायुर्धननाशनं ॥ २ ॥ सर्वगंडसमस्त-
त्रदोषस्तुप्रबलोभवेत् ॥ ३ ॥

अर्थः—चतुर्दशीयुक्त अमावास्येस दासी, भार्या, गाय, हत्तीण, घोडी आणि हैस यांची प्रसूति झाली असतां स्वामीची संपत्ती जाईल. आणि अमावास्येस प्रसूती झाली असतां पुष्कळ दोष आणि स्वामीच्या आयुष्याचा नाश व धनाचा नाश व त्रिविध गंडांतासम प्रबळ दोष कारिणी ही प्रसूति होय असें जाणावें.

## दिनक्षयादि.

दिनक्षयेव्यतीपातेव्याघातेविष्टिवैधृतौ ॥ शूले
गंडेतिगंडेचपरिघेयमघंटके ॥ १ ॥ कालदंडेमृ-
त्युयोगेदग्धयोगेसुदारुणे ॥ तस्मिन्गंडादिनेप्रा-
प्तेप्रसूतिर्यदिजायते ॥ अतिदोषकरीप्रोक्तातत्र
पापयुतेसति ॥ २ ॥

अर्थः—दिनक्षय, व्यतीपात, व्याघात, कल्याणी, वैधृति, शूल, गंड,

अतिगंड, परिघार्ध, यमघंट, कालदंड, मृत्युयोग, दग्धयोग, असे दुष्ट योग यांतून कोणत्याही दुष्ट योगीं गंडांत प्राप्त झाले असतां त्या समयीं प्रसूति झाल्यास ती अति दोषावह होय जन्म लग्नांत पापग्रह असतां विशेषेकरून.

## ज्येष्ठा नक्षत्राचें फळ.

ज्येष्ठादौजननीमाताद्वितीयेजननीपिता ॥ तृतीयेजननीभ्रातास्वीयमाताचतुर्थके ॥ १ ॥ आत्मानंपंचमेहंतिषष्ठेगोत्रक्षयोभवेत् ॥ सप्तमेचोभयकुलंज्येष्ठभ्रातरमष्टमे ॥ नवमेश्वशुरंहंतिसर्वंहंतिदशांशकः ॥ २ ॥

अर्थः—ज्येष्ठा नक्षत्रावर जन्म झालें असल्यास त्याचे ६० घटिकाप्रमाणें भाग १० करावे. आणि पुढें लिहिल्याप्रमाणें फळें पहावी. प्रथम भाग मातेच्या आईस वाईट, २ रा भाग आईचे बापास, तिसरा भाग मातुलास, ४ था भाग मातेस, ५ वा भाग मुलास, ६ वा भाग गोत्रजांस, ७ वा भाग आईच्या व बापाच्या कुळास, ८ वा भाग वडील भावास, ९ वा भाग श्वशुरास. आणि दाहावा भाग सर्वांस वाईट असें जाणावें.

## मूळ नक्षत्राचें फळ.

मूलंस्तंभत्वचाशाखापत्रंपुष्पंफलंशिखा ॥ वेदाश्चमुनयश्चैवदिशश्चवसवस्तथा ॥ १ ॥ नंदबाणरसारुद्रामूलभेदाःप्रकीर्तिताः ॥ मूलेमूलविनाशायस्तंभेहानिर्धनक्षयः ॥ २ ॥ त्वचिभ्रातृविनाशायशाखामातृविनाशकृत् ॥ पत्रेसपरिवारः स्यात्पुष्पेतुनृपवल्लभः ॥ ३ ॥ फलेषुलभतेराज्यं शिखायामल्पजीवितं ॥ ४ ॥

अर्थः—मूळ नक्षत्रास मूळ वृक्ष असें नाम आहे त्याच्या सुमारें घटी ६० त्यांचीं स्थानें अशीं कीं, प्रथम ४ घटी वृक्षाचें मूळ त्यांत जन्म झालें असतां नाश, द्वितीय भाग ७ घटी स्तंभ, हानि व धनाचा नाश; ३ रा भाग १० घटी साल, भावास वाईट; ४ था भाग ८ घटी वृक्षाच्या खांद्या, मातेस वाईट; पांचवा भाग ९ घटी वृक्षपत्रें, परिवाराचा लाभ; ६ वा भाग वृक्षाचीं

पुण्यें, राजास प्रिय होतो. सातवा भाग ६ घटी वृक्षफळ, राज्यप्राप्ति; अठवा भाग ११ घटी वृक्षाचा शेंडा, यांत जन्म झालें असतां अल्पायुपि होतो. असे आठ भाग मिळून एकंदर ६० घटिकांचें मान जाणावें.

## जन्मकालीं मूळ नक्षत्र कोणते लोकीं आहे तें पहावयाचीं लग्नें.

वृषालिसिंहेषुघटेचमूलंदिविस्थितंयुग्मतुलांगनांत्ये ॥ पातालगंमेषधनुःकुलीरनक्रेषुमर्त्येष्वभिसंस्मरंति ॥ १ ॥

अर्थः—वृषभ, वृश्चिक, सिंह कुंभ, या चोहोंतून कोणत्याही लग्नीं जन्म झालें असतां त्या दिवशीं मूळ नक्षत्र स्वर्गीं आहे, त्याचें फळ राज्यप्राप्ति, मिथुन, तूळ, कन्या. मीन या लग्नीं जन्म झालें असतां मूळ पाताळीं आहे; त्याचें फळ धनप्राप्ति; मेष, धन, कर्क, मकर या लग्नीं जन्म झालें तर मृत्यु लोकीं आहे; त्याचें फळ सर्व कुटुंबास वाईट. असें बारा लग्नाचें फळ वेगळें वेगळें जाणावें.

## आश्लेषा नक्षत्राचा नराकार वृक्ष.

मूर्धास्यनेत्रगलकांसयुगंचबाहुहृज्जानुगुह्यपदमित्यहिदेहभागः ॥ बाणाद्रिनेत्रहुतभुक्श्रुतिनागरुद्रषण्नंदपंचशिरसःक्रमशस्तुनाड्यः ॥ १ ॥ राज्यंपितृक्षयोमातृनाशःकामक्रियारतिः ॥ पितृभक्तोबलीस्वघ्नस्त्यागीभोगीधनीक्रमात् ॥ २ ॥

अर्थः—आश्लेषा नक्षत्रांच्या घटिकांचीं नराकार स्थानें. प्रथम ५ घटिका मस्तक, याचें फळ राज्यप्राप्ति, द्वितीय ७ घटिका मुख, हें बापास वाईट, तिसरा भाग २ घटी नेत्र, हा मातेस वाईट; ४ था विभाग ३ घटी गळा, त्याचें फळ स्त्रीरत, पांचवा विभाग ४ घटी दोन्ही खांदे, हा पितृभक्त होईल. सहावा विभाग ८ घटी दोन्हीं बाहू, याचें फळ बळकट. ७ वा विभाग ११ घटिका हृदय, आत्मघातकी. अठवा विभाग ६ घटि दोन्हीं ढोंपें त्यागी. नववा विभाग ९ घटी गुह्य, भोगी. १० वा विभाग ५ घटि. दोन्हीं पाय, धनवान् ज्या भागांत जन्म होईल त्याचें फळ स्थानपरत्वें जाणावें.

## जन्मकालीं ग्रह जसे पडतील तशीं त्यांचीं फळें.

### तनुस्थान.

लग्नस्थितोदिनकरःकुरुतेंगपीडांपृथ्वीसुतोवितनु
तेरुधिरप्रकोपं ॥ छायासुतःप्रकुरुतेबहुदुखभाजं
जीवेंदुभार्गवबुधाःसुखकांतिदास्युः ॥ १ ॥

### धनस्थान.

दुःखावहाधनविनाशकाराःप्रदिष्ठावित्तेस्थितार-
विशनैश्वरभूमिपुत्राः ॥ चंद्रोबुधःसुरगुरुर्भृगुनंद-
नोवानानाविधंधनचयंकुरुतेधनस्थाः ॥ २ ॥

### सहजस्थान.

भानुःकरोतिविरुजंरजनीकरोपिकीर्त्यायुतंक्षिति-
सुतःप्रचुरप्रकोपं ॥ ऋद्धिंबुधःसुधिषणंसुविनीत-
वेषंस्त्रीणांप्रियंगुरुकवीरविजस्तृतीये ॥ ३ ॥

### सुहृत्स्थान.

आदित्यभौमशनयःसुखवर्जितागंकुर्वंतिजन्मनि
नरंसुचिरंचतुर्थे ॥ सोमोबुधःसुरगुरुर्भृगुनंदनोवा
सौख्यान्वितंचनृपकर्मरतंप्रधानं ॥ ४ ॥

### सुतस्थान.

पुत्रेरविःप्रचुरकोपयुतंबुधश्चस्वल्पात्मजंशशिध-
रातनुजावपुत्रं ॥ शुक्रेंदुदेवगुरवःसुतधामसंस्थाः
कुर्वंतिपुत्रबहुलंसुखिनंसुरूपं ॥ ५ ॥

## रिपुस्थान.

मार्तंडभूमितनुजौहतशत्रुपक्षंपंगुर्नरंरिपुगृहेष्व-
पिपूजनीयं ॥ काव्येंदुजौमतिविहीनमनल्परोगं
जीवः करोतिविकलंमरणंशशांकः ॥ ६ ॥

## जायास्थान.

तिग्मांशुभौमरविजाः किलसप्तमस्थाजायांकुक-
र्मनिरतांतनुसंततिंच ॥ जीवेंदुभार्गवबुधाबहुपु-
त्रयुक्तांरूपान्वितांजनमनोहररूपशीलां ॥ ७ ॥

## मृत्युस्थान.

सर्वेग्रहादिनकरप्रमुखानितांतंमृत्युस्थितावितनु-
तेकिलदुष्टबुद्धिं ॥ शस्त्राभिघातपरिपीडितदेहमेनं
सौख्यैर्विहीनमतिरोगगणैरुपेतं ॥ ८ ॥

## धर्मस्थान.

धर्मस्थितारविशनैश्चरभूमिपुत्राः कुर्वंतिधर्मरहि-
तंविमतिंकुशीलं ॥ चंद्रोबुधोभृगुसुतःसुराजमं-
त्रीधर्मक्रियासुनिरतंकुरुतेमनुष्यं ॥ ९ ॥

## कर्मस्थान.

आदित्यभौमशनयःकिलधर्मसंस्थाःकुर्युर्नरंबहु-
कुकर्मरतंकुपुत्रं ॥ चंद्रः सुकीर्तिमुशनाबहुवित्त-
युक्तंरूपान्वितंबुधगुरूशुभकर्मभाजं ॥ १० ॥

## लाभस्थान.

लाभस्थितोदिनकरोनृपलाभयुक्तंतारापतिर्बहु-
धनंक्षितिजःक्षितीशं ॥ सौम्योविवेकसुभगंच
धनायुषीज्यःशुक्रःकरोतिसुगुणंरविजःसुकीर्तिं॥११॥

## व्ययस्थान.

सूर्यःकरोतिपुरुषंव्ययगोविशीलंकाणंशशीक्षिति-
सुतोबहुपापभाजं ॥ चंद्रात्मजोगतधनंधिषणः
कृशांगंशुक्रोबहुव्ययकरंरविजःसुतीव्रं ॥ १२ ॥
राहुकेतुफलंसर्वंमंदवत्कथितंबुधैः ॥ १३ ॥

**अर्थः**—जन्म लग्नी तन्वादि द्वादशभाव स्थानीं जे जे सूर्यादि ग्रह येतील त्यांचा पृथक् पृथक् फलें जाणावयाचें कोष्टक. आणि राहु केतु यांचीं फलें शनिवत् आहेत असें जाणावें.

# पुरुष जातककोष्टक.

| | स्थानें. | रवि | चंद्र. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र | शनि. राहु केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु | अंगपीडा. | कांति आणि सुख | रक्तकोप. | कांति आणि सुख. | | | अतिदुःख दायक |
| २ | धन. | अतिदुःख व धन नाश. | नाना प्रकारची संपत्ति प्राप्ति. | दुःख.प्राप्ति व धन नाश. | नानाप्रकारची संपत्ति प्राप्ति. | | | अतिदुःख प्राप्ति व धनाचा नाश |
| ३ | सहज. | निरोगी असेल. | कीर्ति मिळवील. | कोपयुक्त असेल. | समृद्धि | बुद्धिमान् | नानाविध भारण करणारा | विलास प्रिय होईल |
| ४ | सुहृत्. | शरीरास पीडा बहुत होईल. | सुख भोगील. | शरीरास पीडा बहुत होईल | सुख भोगील. | | | शरीरास पीडा बहुत होईल |
| ५ | सुत. | मोठा रागीट होईल | बहुत पुत्र होतील | संतती होणार नाहीं. | अल्पपुत्र संतती होईल. | बहुपुत्र प्राप्ति. | बहुत पुत्र होतील | संतति होणार नाहीं. |
| ६ | रिपु. | शत्रूचा नाश करील. | मरण पावेल. | शत्रूचा नाश करील. | बुद्धिहीन व बहुत रोगी | शरीर विकलित असेल | बुद्धिहीन व रोगी-बहुत असेल | शत्रुगृहीं पूज्य होईल |
| ७ | जाया. | स्त्री दुष्कर्मी अथवा अल्प प्रसूति | स्त्री रूपवती व बहु पुत्र होईल. | स्त्री दुष्कर्मी संतती अल्प. | स्त्री रूपवती मन हरण करणारी अशी चांगले स्वभावाची मिळेल व बहुत पुत्र होतील. | | | स्त्री दुष्कर्मी व संतति अल्प |
| ८ | मृत्यु | सर्व ग्रहाचें फळ एकच आहे. दुष्टबुद्धि व शस्त्रघातें करून शरीरास पीडा होतील आणि सौख्य रहित असेल जो ग्रह या स्थानीं असेल तो याप्रकारचें फळ देणारा होईल आणि रोगही करील | | | | | | |
| ९ | धर्म. | अधर्मी, दुष्टमति, दुष्टशील | धार्मिक होईल. | अधर्मी, दुष्टमति, दुष्टशील. | धर्म निरंतर करील. | | | अधर्मी दुष्टहीन व दुष्ट स्वभाव अ॰हो॰ |
| १० | कर्म. | अत्यंत दुष्कर्मी व कुपुत्रवान्. | अत्यंत कीर्तिमान् होईल | दुष्कर्मी व कुपुत्री होईल | कांति चांगली | शुभकर्मे करील. | संपत्तिवान् होईल | फार दुष्कर्मी व कुपुत्री होईल |
| ११ | आय | राजाशीं समागम करील | धन पुष्कळ मिळवील | पृथ्वीचे राजापासून लाभ होईल. | विवेक युक्त व सुंदर होईल | धन व आयुष्य वृद्धिपावे | गुणवान् असेल | चांगली कीर्ती मिळवील |
| १२ | व्यय | दुष्टशील होईल. | काणा होईल. | पापकर्मे आचरेल | गतधनी असेल | कृशांग असेल | व्याधियुक्त असेल | तीव्रता असेल |

## मुळाचे जन्मलग्नास मृत्युकारकग्रह.

चंद्राष्टमंचधरणीसुतसप्तमंचराहुर्नवंचशनिजन्म-
गुरुस्तृतीये ॥ अर्कस्तुपंचभृगुषष्टबुधश्चतुर्थे .
जातो न जीवातिनरः प्रवदंतिसंतः ॥ १ ॥

अर्थः—जन्मलग्नापासून चंद्र अष्टमस्थानीं, भौम सप्तमस्थानीं, राहु नवमस्थानीं, शनि जन्मलग्नी, गुरु तृतीयस्थानी, सूर्य पंचमस्थानी, शुक्र षष्ठस्थानीं बुध चतुर्थस्थानी असे ग्रह असले तर मूल वांचणार नाहीं.

## जन्मलग्नीं मुलाचे बायकोस मृत्युकारकग्रह.

षष्ठेचभवनेभौमोराहुःसप्तमसंभवः ॥ अष्टमेच
यदासौरीस्तस्यभार्यानजीवति ॥ १ ॥

अर्थः—जन्मलग्नापासून षष्ठस्थानीं भौम, सप्तस्थानी राहु, अष्टमस्थानी शनि असा ग्रहांचा योग असल्यास त्या मुलाची बायको वांचणार नाही.

## चांगले पराक्रमाचे ग्रह.

मूर्तौशुक्रबुधौयस्यकेंद्रेचैवबृहस्पतिः ॥ दशमों-
गारकश्चैवसज्ञेयः कुलदीपकः ॥ १ ॥

अर्थः—जन्मलग्नी शुक्र आणि बुध बृहस्पति, केंद्री ( प्रथम चतुर्थ सप्तम दशम इतक्या स्थानांस केंद्र म्हणतात यांतून कोणत्याही स्थानी ) दशम स्थानीं भौम असे ग्रह असल्यास तो पुत्र कुलदीपक होईल.

## अपराक्रमी ग्रह सांगतों.

लग्नेशुक्रबुधौनैवकेंद्रेनास्तिबृहस्पतिः ॥ दशमों-
गारकोनैवजातकंकिंकरिष्यति ॥ १ ॥

अर्थः—लग्नी शुक्र, बुध, अथवा केंद्रीं गुरु किंवा दशमस्थानी अंगारक यांतून कोणताही ग्रह सांगितलेल्यास्थानी नसला तर त्याचें जन्म होऊन व्यर्थ जाणावें.

## जातिभ्रंशकारक.

धनस्थानेयदासौरिः सैंहिकेयोधरात्मजः ॥ गु-

क्रोगुरुः सप्तमेचत्वष्टमौरविचंद्रकौ ॥ ब्रम्हपुत्र-
पदेवापिवेश्यासुचसदारतिः ॥ प्राप्तेविंशतिमे
वर्षेम्लेच्छोभवतिनान्यथा ॥ १ ॥

अर्थः—धनस्थानीं शनि, राहू, मंगळ अथवा सप्तमस्थानीं शुक्र गुरु अष्टमस्थानीं रवि, चंद्र, असें ग्रह असतां ब्राह्मणजन्म असलें तथापि वेश्येशीं निरंतर रत असेल आणि २० वर्षांचा झाला ह्मणजे म्लेच्छ होईल.

## मातापितरांसनाशक.

षष्ठेचद्वादशेराशौयदापापग्रहोभवेत् ॥ तदामा-
तृभयंविद्याच्चतुर्थेदशमेपितुः ॥ १ ॥

अर्थः—षष्ठस्थानीं अथवा द्वादशस्थानीं पापग्रह असेल तर मातेस वाईट आणि चतुर्थ किंवा दशमस्थानीं असला तर पित्यास वाईट.

## नाशवंत.

अर्कोराहुः कुजः सौरिर्लग्नेतिष्ठतिपंचमे ॥ पितरं
मातरंहंतिभ्रातरंचशिशुंक्रमात् ॥ १ ॥

अर्थः—जन्मलग्नापासून पंचमग्रह आले तर त्यांचीं फळें रवि आल्यास पित्यास वाईट, राहू मातेस, भौम भ्रात्यास, आणि शनि आल्यास मुलास मृत्युकारक असें क्रमें करून जाणावें.

लग्नस्थानेयदासौरिः षष्ठोभवतिचंद्रमाः ॥ कु-
जस्तुसप्तमस्थानेपितातस्यनजीवति ॥ २ ॥

अर्थः—जन्मलग्नीं शनि, षष्ठस्थानीं चंद्र, सप्तमस्थानीं मंगळ असे ग्रह असले तर पित्यास मृत्युकारक.

पातालस्थोयदाराहुश्चेंदुः षष्ठाष्टमेपिच ॥ पाप-
दृष्टोविशेषेणसद्यः प्राणहरः शिशोः ॥ ३ ॥

अर्थः—जन्मलग्नापासून चतुर्थस्थानीं राहु, षष्ठ अथवा अष्टमस्थानीं चंद्र आणि शेष पापग्रहांची दृष्टी असल्यास जन्म होतांच मृत्यु.

जन्मलग्नेयदाराहुः षष्ठोभवतिचंद्रमाः ॥ जातो मृत्युमवाप्नोतिकुदृष्ट्यात्वपमृत्युना ॥ ४ ॥

अर्थः—जन्म लग्नीं राहु, षष्ठस्थानीं चंद्र असें असल्यास जन्म होतांच मृत्यु आणि जन्मलग्नावर कुदृष्टी असली तर अपमृत्यु.

जन्मलग्नेयदाभौमश्चाष्टमेचबृहस्पतिः ॥ वर्षेच द्वादशेमृत्युर्देवोवैरक्षितायदि ॥ ५ ॥

अर्थः—जन्मलग्नीं मंगळ आणि अष्टमस्थानीं गुरु असें असले तर बारावें वर्षी शंकर रक्षित असला तरीं मृत्यु.

शनिक्षेत्रेयदासूर्योभानुक्षेत्रेयदाशनिः ॥ वर्षेच द्वादशेमृत्युर्देवोवैरक्षितायदि ॥ ६ ॥

अर्थः—शनीचे गृहांत सूर्य सूर्याचे गृहांत शनि असे जन्म कालीं असल्यास देव रक्षित असतांही बारावे वर्षी मृत्यु.

षष्ठाष्टमस्थितोमूर्तौजन्मकालेयदाबुधः ॥ चतुर्थवर्षेमृत्युश्चयदिरक्षतिशंकरः ॥ ७ ॥

अर्थः—षष्ठ अष्टम अथवा जन्मलग्न यांतून कोणत्यही स्थानीं बुध असला तर चतुर्थ वर्षी शंकर रक्षित असतांही मृत्यु.

भौमक्षेत्रेयदाजीवःषष्ठाष्टेषुचचंद्रमाः ॥ वर्षेष्टमेपिमृत्युर्वैईश्वरोरक्षितायदि ॥ ८ ॥

अर्थः—मंगळाचे घरांत गुरु आणि षष्ठ अथवा अष्टम स्थानीं चंद्र असें असले तर आठवे वर्षी ईश्वर रक्षित असतांहीं मृत्यु.

दशमोपियदाराहुर्जन्मलग्नेयदाभवेत् ॥ वर्षेतु षोडशेज्ञेयोबुधैर्मृत्युर्नरस्यच ॥ ९ ॥

अर्थ.—जन्मलग्नापासून दशम स्थानीं किंवा जन्म लग्नीं राहू असला तर सोळावे वर्षी मृत्यु असें जाणावें.

## ग्रहांच्या दृष्टी.

पादैकदृष्टिर्दशमेतृतीयेद्विपाददृष्टिर्नवपंचमेवा ॥

त्रिपाददृष्टिश्चतुरष्टमेचसंपूर्णदृष्टिः समसप्तके च ॥ १ ॥ शनेस्त्रिदशमेपूर्णादृष्टिर्जीवस्यकोणके ॥ बुधैर्ज्ञेयापूर्णदृष्टिर्भौमस्यचतुरष्टके ॥ २ ॥

अर्थ—जन्मलग्नापासून दशमस्थानीं आणि तृतीय स्थानीं जे ग्रह असतील त्यांची एकपाद दृष्टि जन्मलग्नावर असते. याच क्रमानें नव पंचम स्थानीं असतील त्यांचीं द्विपाददृष्टी जाणावी. आणि चतुर्थ अष्टम यास्थानीं असतील त्यांची त्रिपाददृष्टि. सप्तमस्थानीं अ० त्यांची पूर्ण समदृष्टि जाणावी. जन्मलग्ना पासून शनैश्चर दशमस्थानीं अथवा तृतीयस्थानीं असतां जन्मलग्नावर शनीचि पूर्ण दृष्टी, पंचम किंवा नवम गुरु असला तर त्याची लग्नावर पूर्ण दृष्टी आणि चतुर्थ किंवा अष्टमस्थानीं भौम असलातर त्याची लग्नावर पूर्ण दृष्टी असते.

## ग्रहांचेंउच्चत्वनीचत्व

रविर्मेषेतुलेनीचोवृषेचंद्रस्तुवृश्चिके ॥ भौमश्चनक्रेकर्केचस्त्रियांसौम्योझषेतथा ॥ १ ॥ गुरुःकर्केचनक्रेचमीनकन्योसितस्यच ॥ मंदस्तुलायां मेषेचकन्याराहुग्रहस्यच ॥ २ ॥ राहुर्युग्मेतुचापंचतमोवत्केतुजंफलं ॥ प्रोक्तंग्रहाणामुच्चत्वंनीचत्वंचक्रमाद्बुधैः ॥ ३ ॥

अर्थ—रवि मेषींचा असल्यास उच्चत्व; तुळींचा असल्यास नीचत्व; चंद्र वृषभींचा असल्यास उच्चत्व; वृश्चिकीचा असल्यास नीचत्व; भौम मकरींचा असल्यास उच्चत्व, कर्कीचा असला तर नीचत्व; बुध कन्याराशीचा असला तर उच्चत्व; मकरींचा नीच्चत्व; गुरु कर्कीचा उच्चत्व मकरींचा नीचत्व; शुक्र मीनाचा उच्चत्व; कन्येचा नीचत्व; शनि तूळींचा उच्चत्व; आणि मेषींचा नीचत्व; राहूचें कन्यागृह आणि मिथुन हीं उच्चत्वें आणि धनीचा नीचत्व आणि केतूचें फळ राहुवत् जाणावें.

## जन्मलग्नाचींफळें.

मेषेदैन्यमुपैतिगर्वितवृषेनानामतिर्मन्मथःशूरः कर्कटकेधृतीचवनपेकन्याचमायान्विता ॥ स-

त्यंचैवतुलेत्वलौमालिनतापापान्वितंवैधनुर्मूर्खो-
र्यंमकरेघटेचतुरतामीनेत्वधीरामतिः ॥ १ ॥

अर्थः—मेष लग्नीं जन्म झालें असतां दीनपणा, वृषभीं गर्वित, मिथुनीं नानाप्रकारच्या बुद्धि, कर्की मोठा शूर, सिंहलग्नीं स्थिर बुद्धि, कन्यालग्नीं अत्यंत मायावी, तुळीं सत्यवादी, वृश्चिकीं मलिनता, धनलग्नीं पापबुद्धि, मकरीं मूर्खपणा, कुंभीं चतुरता, आणि मीनीं अल्पधीरता. अशीं जन्म लग्नाचीं फलें जाणावीं.

## स्त्रीजातक.

तनुस्थान ॥ मूर्तौकरोतिविधवांदिनकृत्कुजश्च राहुर्विनष्टतनयांरविजोदरिद्रां ॥ शुक्रःशशांकतनयश्चगुरुश्चसाध्वीमायुः क्षयंचकुरुतेथचशर्वरीशः ॥ १ ॥ धनस्थान ॥ कुर्वंतिभास्करशनैश्चरराहुभौमादारिद्र्यदुःखमतुलंविनयंद्वितीये ॥ वित्तेश्वरीमविधवांगुरुशुक्रसौम्यानारींप्रभूतनयां कुरुतेशशांकः ॥ २ ॥ ॥ सहजस्थान ॥ सूर्येंदुभौमगुरुशुक्रबुधास्तृतीयेकुर्युः स्त्रियंबहुसुतां धनभागिनींच ॥ सत्यांदिवाकरसुतः कुरुतेधनाढ्यांलक्ष्मींददातिनियतंकिलसैंहिकेयः ॥ ३ ॥ सुहृत्स्थान ॥ स्वल्पंपयोभवतिसूर्यसुतेचतुर्थे दौर्भाग्यमुष्णकिरणःकुरुतेशशीच ॥ राहुर्विनष्टतनयांक्षितिजोल्पबीजांसौख्यान्वितांभृगुसुरेज्यबुधाश्चकुर्युः ॥ ४ ॥ सुतस्थान ॥ नष्टात्मजारविकुजौखलुपंचमस्थौचंद्रात्मजोबहुसुतांगुरुभार्गवौच ॥ राहूर्ददातिमरणंरविजस्तुरोगंकन्याप्रसूतिनितरांकुरुतेशशांकः ॥ ५ ॥ रिपु-

स्थान ॥ षष्ठस्थिताः शनिदिवाकरराहुभौमजी-
वास्तथाबहुसुतांधनभागिनींच ॥ चंद्रः करोति
विधवामुशनादरिद्रांवेश्यांशशांकतनयः कलह-
प्रियांच ॥ ६ ॥ ॥ भर्त्तृस्थान ॥ सौरारजीव-
बुधराहुरवींदुशुक्रादद्युःप्रसह्यमरणंखलुसप्तम-
स्थाः॥ वैधव्यबंधनभयंक्षयवित्तनाशंव्याधिंप्र-
वासमरणंनियतंक्रमेण ॥ ७ ॥ मृत्युस्थान ॥ ॥
स्थानेष्टमेगुरुबुधौनियतंवियोगोमृत्युः शशीभृ-
गुसुतश्चतथैवराहुः॥ सूर्यःकरोतिविधवांधनि-
नींकुजश्चसूर्यात्मजोबहुसुतांपतिवल्लभांच ॥ ८ ॥
धर्मस्थान ॥ धर्मस्थिताभृगुदिवाकरभूमिपुत्र-
जीवाःसुधर्मनिरतांशशिजः सुभोगां ॥ राहुश्च
सूर्यतनयश्चकरोतिवंध्यांनारींप्रभूततनयांकुरुते
शशांकः ॥ ९ ॥ ॥ कर्मस्थान ॥ ॥ राहुर्नभ-
स्तलगतोविधवांकरोतिपापेपरांदिनकरश्चशनै-
श्चरश्च ॥ मृत्युंकुजोर्थरहितांकुटिलांचचंद्रःशेषा-
ग्रहाधनवतींबहुवल्लभांच ॥ १० ॥ आयस्था-
न ॥ ॥ आयेरविर्बहुसुतांधनिनींशशांकःपुत्रा-
न्वितांक्षितिसुतोरविजोधनाढ्यां ॥ आयुष्मतीं
सुरगुरुर्भृगुजःसुपुत्रींराहुःकरोतिसुभगांसुखिनीं
बुधश्च ॥ ११ ॥ ॥ व्ययस्थान ॥ ॥ अंतेधन-
व्ययवतींदिनकृद्दरिद्रांवंध्यांकुजःपरगतांकुटिलां
चराहुः ॥ साध्वींसितेज्यशशिजाबहुपुत्रपौत्रयुक्तां
विधुःप्रकुरुतेव्ययगोदिनांधाम् ॥ १२ ॥

## अर्थः— कोष्टक.

| | स्थानें. | रवि. | चंद्र. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. | राहु.केतु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु. | विधवा. | आयुष्य नाश. | विधवा. | पतिव्रता हीं तिन्ही ग्रहां. फ.स. स्था०प०एकाग्र० | | | दरिद्री. | पुत्रमरती. |
| २ | धन. | दरिद्र. दुःख | बहुपुत्र वान्. | दरिद्र दुःख. | सौभाग्य व संपत्ति. | | | दरिद्र दुःख. | |
| ३ | सहज | पुत्रवती व धनाढ्य ६ ग्रहांचें एकत्र फल जाणावें. | | | | | | लक्ष्मी युक्त. | |
| ४ | सुहृत्. | दरिद्रता. | दौर्भाग्य. | अल्प संतती हो० | अति सौख्य. | | | दुःखअल्प | पुत्रनाश. |
| ५ | सुत. | मुलाचा नाश. | कन्या पुष्कळ. | मुलांचा नाश. | बहुफल प्राप्ति. | | | रोगी. | मरण पावेल. |
| ६ | रिपु. | धनवती | विधवा. | धनवती. | कलहरूप अप्रिया | धनवती. | दरिद्री वेश्या | धनवती. | |
| ७ | भर्तृ. | रोगी. | प्रवासी. | विधवा. | क्षय. | भय बंधन. | मृत्यु. | वैधव्य मरण. | वित्तनाश |
| ८ | मृत्यु. | विधवा. | वियोग मरणात. | धनवती. | स्वजन वियोग. | | मरणांत वि. | अतिपुत्र संतति. | मरणांत वियोग |
| ९ | धर्म. | धर्म पुष्कळ करील | संतति मान्. | धर्म कृत्यें कारक. | उत्तमभोग भोगील. | धर्म वृद्धि. | | वंध्या. | |
| १० | कर्म. | पाप कारिणी. | दरिद्री जारिणी. | मृत्यु. | धनवती वरास प्रीती. | | | पापकारिणी. | वैधव्य. |
| ११ | आय. | अति पुत्र संतति. | लक्ष्मी युक्त. | पुत्र अत्यंत. | सुख भोगील. | आयुष्य. | पुत्रव. | धनवती. | सौभाग्यवती. |
| १२ | व्यय | खर्चिक. | दिनांध. | वाम जारिणी. | सुपुत्रवती. | सुशीला. | प. अ- | खर्चिक. | जारणकर्म करील. |

## अष्टोत्तरीच्या महादशा.

आर्द्रापुनर्वसुःपुष्यआश्लेषातुरवेर्दशा ॥ मघापू-

वोत्तराचैवचंद्रस्यचदशातथा ॥ १ ॥ हस्तोवि-
शाखाचित्राचस्वातीभौमदशास्मृता ॥ ज्येष्ठा-
नुराधामूलेचसौम्यस्यचदशाबुधैः ॥ २ ॥ अभि-
जिछ्रवणःपूषाऊषाचैवशनेर्दशा ॥ धनिष्ठाशत-
ताराचपूर्वाभाद्रपदागुरोः ॥ ३ ॥ ऊभापूषाश्विनी-
कालाराहोश्चैवदशास्मृता ॥ कृतिकारोहिणीप्रो-
क्तामृगः शुक्रदशाबुधैः ॥ ४ ॥ एषांभानांक्रमे-
णैवज्ञेयाःसूर्यादिकादशाः ॥ क्रूरजाअशुभाःप्रो-
क्ताशुभास्यात्सौम्यखेटजा ॥ ५ ॥

अर्थः—आर्द्रापासून आरंभ तो मृगापर्यंत २८ नक्षत्रें आणि रवि आदीकरून शुक्रापर्यंत आठ ग्रह यांचीं कोष्टकें पृथक्पृथक् केलीं आहेत. त्याजवरून महा दशांची वर्ष संख्या आहे. त्यांत पापग्रह नक्षत्रें ४ चार आणि सौम्य ग्रहांची तीन तीन जाणावीं. दशांची संख्या-भरून घेणें ती नक्षत्रांचे विभागानें घ्यावी. आणि ज्या विभागांत जन्म होईल त्याप्रमाणें भोग्याभोग्य दशा जाणावी. आणि जन्मकालीं जी दशा ती प्रथम जाणावी.

## महादशांचा संख्याक्रम.

सूर्यस्यऋतुवर्षाणिइंदोःपंचदशैवच ॥ भौमस्य
वसुवर्षाणिऋषिचंद्रबुधस्यच ॥ १ ॥ मंदस्यद-
शवर्षाणिगुरोश्चैकोनविंशतिः ॥ राहोर्द्वादशवर्षा-
णिशुक्रस्यैकोनविंशतिः ॥ २ ॥

अर्थः— सूर्याची महादशा वर्षें ६, चंद्राचीं १५ वर्षें, भौमाचीं ८ वर्षें,

बुधाचीं १७ वर्षे, शनीचीं १० वर्षे, गुरूचीं १९ वर्षे, राहूचीं १२ वर्षे, शुक्राचीं २१ वर्षे याप्रमाणें महादशा जाणावी.

## अंतर्दशा आणावयाचा क्रम.

महादशास्वस्वदशाब्दनिघ्नाभक्तागजाकाशकु-भिःसमाद्याः ॥ अंतर्दशाःस्युर्गगनेचराणांतदेक भावोहिमहादशास्यात् ॥ १ ॥

अर्थः—ज्या ग्रहाची अंतर्दशा पाहिजे त्याच्या वर्षसंख्येनें महादशेची वर्षसंख्या गुणून १०८ नीं भागून जो भाग येईल ती वर्षें जाणावी. आणि शेष उरेल तें १२ नी गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील ते मास जाणावें आणि जें शेष उरेल तें ३० नीं गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील ते दिवस जाणावे. आणि जें शेष उरेल तें ६० नीं गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील त्या घटिका जाणाव्या. असा क्रम महादशांतील अंतर्दशा पाहण्याचा जाणावा. १२० चा भाग विंशोत्तरीला घ्यावा.

| सूर्याची महादशा वर्षें. ६ आर्द्रा पुनर्वसु पुष्य आश्लेषा. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा क्रम. | | | | | |
| ग्रहांचीं नावें. | वर्षें. | मास | दिवस. | घटी. | फळें. |
| रवि. | ० | ४ | ० | ० | अशुभ. |
| चंद्र. | ० | १० | ० | ० | शुभ. |
| मंगळ. | ० | ५ | १० | ० | अशुभ. |
| बुध. | ० | ११ | १० | ० | शुभ. |
| शनि. | ० | ६ | २० | ० | अशुभ. |
| गुरु. | १ | ० | २० | ० | शुभ. |
| राहु. | ० | ८ | ० | ० | अशुभ. |
| शुक्र. | १ | २ | ० | ० | शुभ. |
| संख्या. | ६ | ० | ० | ० | |

| चंद्राची महादशा वर्षे. १५ मघा. पूर्वा. उत्तरा | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहांची नांवें. | वर्षें. | मास | दिवस | घटी. | फळें. |
| चंद्र. | २ | १ | ० | ० | शुभ. |
| भौम. | १ | १ | १० | ० | अशुभ. |
| बुध. | २ | ४ | १० | ० | शुभ. |
| शनि. | १ | ४ | २० | ० | अशुभ. |
| गुरु. | २ | ७ | २० | ० | शुभ. |
| राहु. | १ | ८ | ० | ० | अशुभ. |
| शुक्र. | २ | ११ | ० | ० | शुभ. |
| रवि. | ० | १० | ० | ० | अशुभ. |
| संख्या. | १५ | ० | ० | ० | ० |

| भौमाची महादशा वर्षें. ८ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| हस्त. चित्रा. स्वाती. विशाखा. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहाची नांवें. | वर्षें. | मास | दिवस. | घटी. | फळें. |
| भौम. | ० | ७ | ३ | २० | अशुभ. |
| बुध. | १ | ३ | ३ | २० | शुभ. |
| शनि. | ० | ८ | २६ | ४० | अशुभ. |
| गुरु. | १ | ४ | २६ | ४० | शुभ. |
| राहु. | ० | १० | २० | ० | अशुभ. |
| शुक्र. | १ | ६ | २० | ० | शुभ. |
| रवि. | ० | ५ | १० | ० | अशुभ. |
| चंद्र. | १ | १ | १० | ० | शुभ. |
| सख्या. | ८ | ० | ० | ० | |

| बुधाची महादशा वर्षें. १७. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अनुराधा. ज्येष्ठा. मूळ. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहाची नांवें. | वर्षें. | मास | दिवस. | घटी. | फळें. |
| बुध. | २ | ८ | ३ | २० | शुभ. |
| शनि. | १ | ६ | २६ | ४० | अशुभ. |
| गुरु. | २ | ११ | २६ | ४० | शुभ. |
| राहु. | १ | १० | २० | ० | अशुभ. |
| शुक्र. | ३ | ३ | २० | ० | शुभ. |
| रवि. | ० | ११ | १० | ० | अशुभ. |
| चंद्र. | २ | ४ | १० | ० | शुभ. |
| भौम. | १ | ३ | ३ | २० | अशुभ. |
| सख्या. | १७ | ० | ० | ० | |

| शनीची महादशा वर्षें. १० | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पूर्वाषाढा उत्तराषाढा अभिजित् श्रवण. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहाची नांवें. | वर्षें | मास | दिवस | घटी | फळें. |
| शनि. | ० | ११ | ३ | २० | अशुभ. |
| गुरु. | १ | ९ | ३ | २० | शुभ. |
| राहु. | १ | १ | १० | ० | अशुभ. |
| शुक्र. | १ | ११ | १० | ० | शुभ. |
| रवि. | ० | ६ | २० | ० | अशुभ. |
| चंद्र. | १ | ४ | २० | ० | शुभ. |
| भौम. | ० | ८ | २६ | ४० | अशुभ. |
| बुध. | १ | ६ | २६ | ४० | शुभ. |
| सख्या. | १० | ० | ० | ० | |

| गुरूची महादशा वर्षें १९ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| धनिष्ठा शततारका पूर्वाभाद्रपदा. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहांची नावें. | वर्षें | मास | दिवस | घटि | फळें. |
| गुरु. | ३ | ४ | ३ | २० | शुभ. |
| राहु. | २ | १ | १० | ० | अशुभ. |
| शुक्र. | ३ | ८ | १० | ० | शुभ. |
| रवि. | १ | ० | २० | ० | अशुभ. |
| चंद्र. | २ | ७ | २० | ० | शुभ. |
| भौम. | १ | ४ | २६ | ४० | अशुभ. |
| बुध. | २ | ११ | २६ | ४० | शुभ. |
| शनि. | १ | ९ | ३ | २० | अशुभ. |
| सख्या. | १९ | ० | ० | ० | |

| राहूची महादशा वर्षे १२ उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी. भरणी, | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहांचीं नावें. | वर्षे. | मास | दिवस. | घटी. | फळें. |
| राहू. | १ | ४ | ० | ० | अशुभ. |
| शुक्र. | २ | ४ | ० | ० | शुभ. |
| रवि. | ० | ८ | ० | ० | अशुभ. |
| चंद्र. | १ | ८ | ० | ० | शुभ. |
| भौम. | ० | १० | २० | ० | अशुभ |
| बुध. | १ | १० | २० | ० | शुभ. |
| शनि. | १ | १ | १० | ० | अशुभ. |
| गुरु. | २ | १ | १० | ० | शुभ. |
| संख्या. | १२ | ० | ० | ० | |

| शुक्राची महादशा वर्षे २१. कृतिका. रोहिणी. मृगशिर. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहाची नावें | वर्षे. | मास | दिवस. | घटी. | फळें. |
| शुक्र. | ४ | १ | ० | ० | शुभ. |
| रवि. | १ | २ | ० | ० | अशुभ. |
| चंद्र. | १ | ११ | ० | ० | शुभ. |
| भौम. | १ | ६ | २० | ० | अशुभ. |
| बुध. | ३ | ६ | २० | ० | शुभ. |
| शनि. | १ | ११ | १० | ० | अशुभ. |
| गुरु. | ३ | ८ | १० | ० | शुभ. |
| राहु. | २ | ४ | ० | ० | अशुभ. |
| संख्या. | २१ | ० | ० | ० | |

## विंशोत्तरीच्यामहादशा व अंतर्दशा.

नयनोनजनुर्भमंकत्हृत्क्रमशोर्केंदुकुजागुधीषणाः॥ शनिचंद्रजकेतुभार्गवाः परिशेषात्तुदशाधिपा-स्ततः ॥ १ ॥

अर्थः-जें जन्मनक्षत्र असेल त्यांत दोन कमी करून नवानीं भागावें आणि १ शेष उरला तर रवीची दशा आहे; २ उरले तर चंद्राची दशा; ३ उरले तर भौमाची दशा; ४ उरले तर राहूची दशा; ५ उरले तर गुरूची दशा; ६ उरले उर शनीची दशा; ७ उरले तर बुधाची दशा; ८ उरले तर केतूची दशा आणि भाग पुरला तर शुक्राची दशा आहे या प्रकारें दशाधिप जाणावे.

## दशांची वर्षसंख्या व भोग्याभोग्य.

ऋतुदिग्गिरयोधृतिर्नृपाऽतिधृतीमेघहयौनखाः समाः ॥ क्रमतोहिमताअथादिमाजानिभस्थाघ-टिकाः समाहृताः ॥ भभोगेनभक्ताः फलंभुक्त-पाकस्तदूनादशासाभवेद्भोग्यसंज्ञा ॥ १ ॥

## गृहांच्याराशी.

अश्विन्यादित्रयेमेषोभआदित्रितयेहरिः ॥ मूला-
दित्रितयेधन्वीभद्वयंशेषराशिषु ॥ १९ ॥

अर्थः—गृहाचें नक्षत्र आश्विनी, भरणी, कृत्तिका, यांची राशी मेष १; रोहिणी, मृग यांत वृषभ २; आर्द्रा, पुनर्वसु यांस मिथुन ३; पुष्य, आश्लेषा यांस कर्क ४; मघा, पूर्वा, उत्तरा यांस सिंह ५; हस्त चित्रा यांस कन्या ६; स्वाती, विशाखा यांस तूळ ७; अनुराधा, ज्येष्ठा यांस वृश्चिक ८; मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा यांस धन ९; श्रवण, धनिष्ठा, यांस मकर १०; शततारका, पूर्वाभाद्रपदा यांस कुंभ ११; उत्तराभाद्रपदा, रेवती यांस मीन. १२ याप्रकारे गृहांच्या राशी जाणाव्या.

## गृहाचें नाम आणण्याचा प्रकार.

गृहस्यपूर्वतोदिक्षुक्रमात्कक्ष्यब्धिदंतिनः ॥ सं-
स्थाप्यालिंदिशामेकंतन्मित्याषोडशगृहाः ॥ २० ॥

अर्थः—गृहाचे पूर्वदिशाक्रमानें अंक घालावयाचे ते असे कीं, पूर्वेस १, दक्षिणेस २, पश्चिमेस ४, उत्तरेस ८ असे चहूं दिशांस स्थापावे आणि त्या गृहाचें मुख असेल त्या दिशाकांत शिलांची संख्या असेल त्यावर १ अधिक धरून ती संख्या मिळवावी. जे अंक येतील तें त्या गृहाचें नाम जाणावें.

## गृहाचीं नामें.

ध्रुवंधन्यंजयंनंदंखरंकांतंमनोरमं ॥ सुमुखंदुर्मुखं
क्रूरंरिपुदंधनदंक्षयम् ॥ २१ ॥ आक्रंदंविपुलंज्ञे-
यंविजयंचेतिषोडश ॥ गृहंध्रुवादिकंज्ञेयंनामतु-
ल्यफलप्रदम् ॥ २२ ॥ ॥ ॥

अर्थः—हीं षोडश नावें आहेत. त्यांचीं फळें नामाप्रमाणें शुभाशुभ जाणावीं.

## अंश आणण्याचा प्रकार.

व्ययेनसंयुतंक्षेत्रंगृहनामाक्षरान्वितं ॥ त्रिभिर्भ-
क्तांशकास्तेषांद्वितीयांशोनशोभनः ॥ २३ ॥

अर्थः—मागील व्यय अंक आला असेल तो क्षेत्रफळांत मिळवून गृहाचीं नामाक्षरें मिळवावीं. आणि ३ नीं भागावें. शेष २ उरले तर अशुभ अन्य शुभ होत.

## गृहाचे भाग.

नवभागंगृहंकृत्वापंचभागंतुदक्षिणे ॥ त्रिभागंवामतःकुर्याच्छेषंद्वारंप्रकल्पयेत् ॥ २४ ॥ ॥

अर्थः—गृह क्षेत्राचे ९ भाग करावे. त्यांतून ५ भाग दक्षिणेस आणि ३ भाग उत्तरेस व मध्यें १ भाग. तें द्वार या प्रकारें भाग कल्पावे.

## गृहाचे द्वार.

द्वारस्थोपरियद्वारंद्वारस्यान्यद्वसन्मुखं ॥ व्ययदंतुयदातद्वत्कर्तव्यंशुभेप्सुभिः ॥ २५ ॥ ॥

अर्थः—द्वारावर द्वार आणि समोरासमोर हीं व्ययदायक होत. हीं शुभ इच्छकांनीं वर्ज करावीं.

## गृहाचे स्थानाचे योजनेचा प्रकार.

स्नानागारंदिशिप्राच्यामाग्नेय्यांपचनालयं ॥ याम्यायांशयनागारंनैर्ऋत्यांशस्त्रमंदिरं ॥ २६ ॥प्रतिच्यांभोजनागारंवायव्यांपशुमंदिरं ॥ भांडकोशंचोत्तरस्यामीशान्यांदेवमंदिरं ॥ २७ ॥

अर्थः—पूर्वेस स्नानाचें घर, आग्नेयीस पाकमंदीर २, दक्षिणेस शयनाचें स्थान नैर्ऋत्येस शस्त्रमंदीर ४. पश्चिमेस भोजनस्थान ५, वायव्येस पशुमंदीर ६, उत्तरेस कोशभांडार ७, ईशान्येस देवमंदीर ८ या प्रकारें योजना करावी.

## अल्पदोष.

अल्पदोषंगुणश्रेष्ठंदोषायनभवेत्गृहं ॥ आयव्ययौप्रयत्नेनविरुद्धंभंचवर्जयेत् ॥ २८ ॥ ॥

अर्थः—गृहास अल्प दोष आला परंतु तें बहुत गुणांनीं श्रेष्ठ असलें तर त्यास दोष नाहीं. आयव्यय अथवा नक्षत्र विरुद्ध असलें तर तें वर्जावें.

## वास्तुचक्राचीं नांवें.

आरंभेवृषभंचक्रंस्तंभेज्ञेयंतुकूर्मकं ॥ प्रवेशेकलशंचक्रंवास्तुचक्रंबुधैःस्मृतं ॥ २९ ॥ ॥

अर्थः—गृहारंभास वृषवास्तु, स्तंभस्थापनास कूर्म वास्तु आणि गृहप्रवेशास कलश वास्तु ही वास्तुचक्रें पहावीं.

## गृहारंभास मास.

पौषफाल्गुनवैशाखभाद्रश्रावणकार्तिकाः ॥ मासाःस्युर्गृहनिर्माणेपुत्रारोग्यधनप्रदाः ॥ ३० ॥

अर्थः—पौष, फाल्गुन, वैशाख, भाद्रपद, श्रावण, कार्तिक ह्या महिन्यांत गृहारंभास शिलान्यास व स्तंभप्रतिष्ठा करणें प्रशस्त होय. आणि पुत्र, आरोग्यता, आयुर्वृद्धि आणि धन यांची प्राप्ती होते.

## गृहारंभास मासफळें.

शोकंधान्यंपंचतांनिःपशुत्वंस्वाप्तिंनैःस्वंसंगरं भृत्यनाशम् ॥ श्रींश्रीप्राप्तिंवन्हिभीतिंचलक्ष्मीं कुर्याच्चैत्राद्योगृहारंभकाले ॥ ३१ ॥

अर्थः—चैत्रमास शोक प्राप्ति १, वैशाख धान्य प्राप्ति २, ज्येष्ठ मृत्यु ३, आषाढ निः पशुत्व. ४, श्रावण द्रव्य प्राप्ति. ५, भाद्रपद दरिद्र ६, आश्विन कलह ७, कार्तिक चाकराचा नाश ८, मार्गशीर्ष धन प्राप्ति ९, पौष लक्ष्मी १०, माघ अग्नि भय ११, फाल्गुन लक्ष्मी १२ याप्रकारें मास फळें जाणावीं.

## गृहाचें मुख दिशापरत्वें करावयाचें.

कर्कनक्रहरिकुंभगतेर्केपूर्वपश्चिममुखानिगृहाणि ॥ तौलीमेषवृषवृश्चिकयातेदक्षिणोत्तरमुखानिवदंति ॥ ३२ ॥

अर्थः—कर्क, मकर, सिंह, कुंभ, या राशींस सूर्य असतां गृहाचें मुख पूर्वेस अथवा पश्चिमेस करावें. तूळ, मेष, वृषभ, वृश्चिक, या राशींस सूर्य असतां गृहाचें मुख दक्षिणेस अथवा उत्तरेस करावें असें रत्न माला ग्रंथीं आहे.

## गृहांचे आरंभास नक्षत्रें.

त्र्युत्तरामृगरोहिण्यांपुष्यमैत्रकरत्रये ॥ धनिष्ठा-
द्वितयेपौष्णेगृहारंभः प्रशस्यते ॥ ३३ ॥ आ-
दित्यभौमवर्ज्याश्चसर्ववाराः शुभावहाः ॥ चंद्रा-
दित्यबलंलब्ध्वालग्नेशुभनिरीक्षिते ॥ ३४ ॥ स्तं-
भोच्छ्रायंतुकर्तव्यमन्यत्तुपरिवर्जयेत् ॥ प्रासा-
देष्वेवमेवस्यात्कूपवापीषुचैवहि ॥ ४५ ॥

अर्थः—३ उत्तरा, मृग, रोहिणी, पुष्य, अनुराधा, हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्ठा, शततारका, रेवती हीं नक्षत्रें गृहारंभास उक्त. रवि, भौम हे वार वर्ज्य करून कोणत्याही वारीं व ज्या स्थिर लग्नीं शुभ ग्रहांची दृष्टी असेल तें लग्न घेऊन स्तंभारोपण करावें. अन्यकर्मास उक्त नाही. देवळें, कूप, वा-पी, तडाग इत्यादिकांस उक्त होय.

## वृषचक्र.

त्रिवेदाब्धित्रिवेदाब्धिद्वित्रिभेष्वर्कतः शशी ॥
कुर्याल्लक्ष्मीसमुद्वासंस्थैर्यंलक्ष्मीदरिद्रता ॥ ध-
नंहानिः क्रमान्मृत्युरारंभेवृषचक्रकं ॥ ३६ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजण्याचा क्रम आहे तो प्रथम भाग ३ नक्षत्रें लक्ष्मी दायक, द्वितीय भाग ४ नक्षत्रें उद्वास, तृतीय भाग ४ नक्षत्रें स्थिरता, चतुर्थ भाग ३ नक्षत्रें लक्ष्मी, पंचम भाग ४ नक्षत्रें दरिद्रता, षष्ठ भाग ४ नक्षत्रें धन, सप्तम भाग २ नक्षत्रें; हानि, अष्टम भाग ३ नक्षत्रांचें फळ मृत्यु. याप्रकारें पाहण्याचा क्रम यांतून शुभ फळ ज्या-दिवस नक्षत्रास येईल त्या दिवशीं गृह आरंभास उक्त होय.

## शिलान्यास.

दक्षिणपूर्वेकोणेकृत्वापूजांशिलांन्यसेत्प्रथमां ॥
शेषाः प्रदक्षिणेनस्तंभाश्चैवंसमुत्थाप्याः ॥३७॥

अर्थः—प्रथम शिलेची पूजा करून आग्नेय कोणांत स्थापन करावी. आणि इतर शिला सर्व दक्षिणेच्या क्रमे करून मांडाव्या व याच क्रमानें स्तंभ उभे करावे.

## शिलान्यासास नक्षत्रें.

शिलान्यासः प्रकर्तव्योगृहाणांश्रवणेमृगे ॥ पौ-
ष्णेहस्तेचरोहिण्यांपुष्याश्विन्युत्तरात्रये ॥ ३८ ॥

अर्थः—शिलान्यासास श्रवण, मृग, रेवती, हस्त, रोहिणी, पुष्य, आश्वि-
नी, ३ उत्तरा ही नक्षत्रें उक्त होय.

## शेषाचें मुख.

कन्यासिंहेतुलायांभुजगपतिमुखंशंभुकोणेऽग्नि
खातंवायव्येस्यात्तदास्यंत्वलिधनमकरेईशखा-
तंवदंति ॥ कुंभेमीनेचमेषेनिर्ऋतिदिशिमुखं-
खातवायव्यकोणे चाग्नेःकोणेमुखंवैवृषमिथुनग-
तेकर्कटरक्षखातं ॥ ३९ ॥

अर्थः—कन्या, सिंह, तूळ, या लग्नीं शेषाचें मुख ईशान्य कोणी तर आ-
ग्नेय कोणास खात करावें. वृश्चिक, धन, मकर, या लग्नीं शेषाचें मुख वाय-
व्येस असतें तर ईशान्येस खात करावें. कुंभ, मीन, मेष या लग्नीं शेष मुख
नैर्ऋत्येस असतें तर वायव्य कोनास खात करावें. वृषभ, मिथुन, कर्क या
लग्नीं आग्नेयेस असते तर नैर्ऋत्येस खात करावा.

## दुष्टयोग.

वज्रव्याघातशूलाश्चव्यतीपातश्चगंडकः ॥ विष्कं
भपरिघौवर्ज्यौवारौमंगलभास्करौ ॥ ४० ॥

अर्थः—वज्र, व्याघात, शूल, व्यतीपात, गंड, विष्कंभ, परिघ आणि
भौम रवि हे वार असे वर्जावे.

## कूर्मचक्र.

तिथिस्तुपंचगुणिताकृत्तिकाद्यृक्षसंयुता ॥ तथा-
द्वादशभिश्चंचनवभागेनभाजिता ॥ ४१ ॥ फल ॥
जलेवेदामुनिश्चंब्रस्थलेपंचद्वयंवसु ॥ त्रिषट्केन-
वचाकाशेत्रिविधंकूर्मलक्षणं ॥ ४२ ॥ जलेलाभ-

स्तथाप्रोक्तःस्थलेहानिस्तथैवच ॥ आकाशेमरणंप्रोक्तमिदंकूर्मस्यचक्रकम् ॥ ४३ ॥

अर्थः—गृहारंभाची तिथी ५ नीं गुणावी. आणि कृत्तिका पासून दिवस नक्षत्रा पावेतों नक्षत्रें येतील ती आंत मिळवून आणखी १२ अंक मिळवावे एकंदर संख्येस ९ नीं भागावें. शेष १।४।७ राहिले असतां कूर्म जलस्थानीं आहे, त्याचें फळ लाभ आणि ५।२।८ शेष उरले तर कूर्म स्थळाचे ठायीं आहे त्याचें फळ हानि. ३।०।६ शेष उरलें तर कूर्म आकाशीं आहे त्याचें फळ मरण. असे त्रिविध कूर्म लक्षण जाणावें.

## घटित काष्ठ उभें करण्यास मुहूर्त.

### स्तंभचक्र.

सूर्याधिष्ठितभद्वयप्रथमतोमध्येतथाविंशतिस्तंभाग्रेरससंख्ययामुनिवरैरुक्तोमुहूर्तःशुभः ॥ फल ॥ स्तंभाग्रेमरणंभवेत्गृहपतेर्मूलेधनार्थक्षयंमध्येचैवतुसर्वसौख्यमतुलंप्राप्नोतीकर्तासदा ॥ ४४ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों घ्यावयाचा क्रम त्यांत प्रथम दोन नक्षत्रें स्तंभमूल त्याचें फल धन क्षय. द्वितीय २० नक्षत्रें स्तंभ मध्य श्री, लक्ष्मी, कीर्ती आणि तृतीय ६ नक्षत्रें स्तंभाग्र फल मरण असें आहे, यास्तव ज्या विभागाचें शुभफल असेल त्यानक्षत्री स्तंभारोपण करावें.

### आढ्यासमुहूर्त.

मूलेभौमेत्रिऋक्षंगृहपतिमरणंपंचगर्भेसुखंस्यान्मध्येदेयाष्टऋक्षंधनसुतसुखदंपुच्छदेशेऽष्टहानिः ॥ पश्चाद्देयंत्रिऋक्षंगृहपतिसुखदंभाग्यपुत्रार्थदेयंसूर्यर्क्षाच्चंद्रऋक्षंप्रतिदिनगणयेद्भौमचक्रं विलोक्य ॥ ४५ ॥ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रा-पासून दिवस नक्षत्रा पावेतों घेण्याचा क्रम आहे तो प्रथम ३ नक्षत्रें मूळ, स्वामीस मृत्यू. द्वितीय ५ नक्षत्रें गर्भी, सुख तृतीय ८ नक्षत्रें मध्य, धनसुत सुख. चतुर्थ ८ नक्षत्रें पुच्छभाग, हानि, पंचम ३ नक्षत्रें अग्रे सुख, भाग्य, पुत्र लाभ अशीं शुभाशुभ फळें आहेत.

## द्वारचक्र.

अर्कोच्चत्वारिऋक्षाणिउर्ध्वेचैवप्रदापयेत् ॥ द्वौद्वौ कोणेषुदद्याद्वैशाखायांचचतुश्चतुः ॥ ४६ ॥ अधश्चत्वारिदेयानिमध्येत्रीणिप्रदापयेत् ॥ ऊर्ध्वेतुलभतेराज्यमुद्वासंकोणकेषुच ॥ ४७ ॥ शाखायां लभतेलक्ष्मीमध्येराज्यप्रदंतथा ॥ अधस्थेमरणं प्रोक्तंद्वारचक्रंप्रकीर्तितं ॥ ४८ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत घेण्याचा क्रम. यांत प्रथम चार नक्षत्रें उर्ध्वं, त्यांचें फळ राज्य प्राप्ति. द्वारकोण ४ त्यांचे दर कोणास २ नक्षत्रें त्यांचें फळ उद्वास. दर बाजूस नक्षत्रें ४ चार प्रमाणें बाजू २ फळ लक्ष्मी. उंबरवट्यास नक्षत्रें ४ फळ राज्य. मध्य ३ नक्षत्रें फळ मरण.

## शांतीस अग्निचक्र.

सैकातिथिर्वारयुताकृताप्ताशेषेगुणेभ्रेभुविवन्हिवासः ॥ सौख्यायहोमेविधुयुग्मशेषेप्राणार्थनाशौदिविभूतलेच ॥ ४९ ॥ ॥ ॥

अर्थः—ज्या तिथीस वास्तुशांति करणें ती तिथि व त्यांत १ मिळवावा आणि त्या दिवशीं जो वार असेल तो वाराचा अंक त्यांत मिळवून एकंदर संख्येस चहूंनीं भागून शेष उरेल त्याचें फळ पहावें. ३ अथवा शून्य शेष उरलें असतां अग्नि मृत्युलोकीं आहे त्याचें फळ सौख्यप्राप्ति. शेष १ उरला असतां अग्नि स्वर्गलोकी त्याचें फळ प्राणनाश व २ उरलें असतां अग्नि पाताळीं. फळ अर्थनाश.

## ग्रहमुखांत आहुतिपात पाहणें.

तरणिवित्भृगुभास्करिचंद्रमाकुजसुरेज्यविधुंतुदकेतवः ॥ रविभतोदिनभंगणयेत्क्रमात्प्रतिखगंत्रितयंत्रितयंन्यसेत् ॥ ५० ॥ ॥ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों मोजण्याचा क्रम प्रथम ३ नक्षत्रें रविमुखांत आहुतिपात होतो. त्याचें फळ अशुभ. द्वितीय भाग ३

नक्षत्रें बुध मुखांत आहुतिपात होतो. त्याचें फळ शुभ, तृतीय भाग ३नक्षत्रें शुक्रमुखीं आहुति त्याचें फळ शुभ चतुर्थ भाग३ नक्षत्रें शनिमुखांत त्याचें फळ अशुभ, पंचम भाग ३ नक्षत्रें चंद्राचे मुखांत त्याचें फळ शुभ. षष्ठ भाग ३ नक्षत्रें भौममुखांत त्याचें फळ अशुभ. सप्तम भाग ३ नक्षत्रें गुरुमुखांत त्याचें फळ शुभ, अष्टम भाग ३ नक्षत्रें राहुमुखांत त्याचें फळ अशुभ. नवम भाग ३ नक्षत्रें केतुमुखांत फळ अशुभ.

## गृहप्रवेशाचा क्रम.

अथप्रवेशोनवमंदिरस्ययात्रानिवृत्तावथभूपतीनां ॥ सौम्यायनेपूर्वदिनेविधेयंवास्त्वर्चनंभूतबलिंचसम्यक् ॥ ५१ ॥ ॥ ॥

अर्थः—नवे गृहांत प्रवेश करणें, यात्रेहून घरीं जाणें, यांचे पूर्व दिवशीं वास्तुपूजा करून भूतबलि द्यावा. आणि उदगयनही असावें.

चित्रानुराधामृगपौष्णपुष्यस्वातीधनिष्ठाश्रवणंचमूलं ॥वारेष्वसूर्यक्षितिजेष्वरिक्तातिथौप्रशस्तोभवनप्रवेशः ॥ ५२ ॥ ॥ ॥

अर्थः-चित्रा, अनुराधा, मृग, रेवती, पुष्य, स्वाती, धनिष्ठा, श्रवण मूल हीं नक्षत्रें उक्त आणि रवि, भौम हे वार व रिक्तातिथि वर्ज्य करून गृहप्रवेश करावा.

## कलशचक्र.

प्रवेशेकलशेर्कर्क्षात्पंचनागाष्टषट्क्रमात् ॥ अशुभंचशुभंज्ञेयमशुभंचशुभंतथा ॥ ५३ ॥

अर्थः-सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत मोजण्याचा क्रम. प्रथम ५ नक्षत्रें अशुभ. पुढें ८ नक्षत्रें शुभ. त्यापुढें ८ नक्षत्रें अशुभ व पुढें ६ नक्षत्रें शुभ या प्रकारें कलश चक्र होय

## वामार्कलक्षण.

रंध्रात्पुत्राद्धनादायात्पंचस्वर्क्षेस्थितेक्रमात् ॥ पूर्वाशादिमुखेगेहेविशेद्वामोभवेदिनः ॥ ५४ ॥

अर्थः—गृहांत प्रवेश करण्याचे समयीं सूर्य वाम असावा तो पाहण्याचा क्रम. प्रवेशलग्नी अष्टम स्थानापासून पांच स्थानापर्यंत सूर्य वाम घराचें मुख पूर्वेस असलें तर; तसेंच घराचें मुख दक्षिणेस असलें तर पंचम स्थानापासून पांच स्थानीं; घराचें मुख पश्चिमेस असल्यास द्वितीय स्थानापासून ५ स्थानापर्यंत आणि घराचें मुख उत्तरेस असल्यास ११ स्थानापासून ५ स्थानापर्यंत असा सूर्य पूर्वादि द्वारक्रमानें असला तर वाम होतो. तो, प्रवेश कालीं उक्त जाणावा.

## लग्नीं शुभाशुभ ग्रह पाहणें.

त्रिकोणकेंद्रगैःशुभैस्त्रिषष्ठलाभसंस्थितैः ॥ असत्ग्रहैःस्थिरोदयेगृहंविशेद्बलेविधोः ॥ ५५ ॥

अर्थः—गृहप्रवेशास स्थिर लग्न पाहून त्या लग्नीं त्रिकोण ( ९।५ ) व केंद्र ( १।४।७।१० ) या स्थानीं शुभ ग्रह असावे व ३।६।११ या स्थानीं पापग्रह असावे असा लग्नी चंद्रबळ पाहून गृहप्रवेश करावा.

## लग्नशुद्धि.

त्रिषडायगतैःपापैरष्टांत्येतरगैःशुभैः ॥ चंद्रेलग्नारिरंध्रांत्यवर्जितेस्याच्छुभंगृहं ॥ ५६

अर्थः—३।६।११ या स्थानीं पापग्रह आणि ८।१२ या स्थानाहून इतर स्थानीं शुभ ग्रह असल्यास शुभ जाणावे. परंतु, चंद्र लग्न, षष्ठ, अष्टम, द्वादश या स्थानीं नसावा.

## अशुभ योगाचें लग्न.

धनकेंद्रत्रिकोणस्थःक्षीणचंद्रोनशोभनः ॥ शत्रोर्नवांशगःखेटःखास्तसंस्थोपिनोशुभः ॥५७॥

अर्थ.—लग्नाचे ठायीं २,१,४,७,१०,५,९ यास्थानीं कृष्णपक्षींचा चंद्र अशुभ. आणि शत्रूचा नवांशीचा कोणताही ग्रह १०।७ या स्थानी नसावा.

## आयुष्य प्रमाण.

लग्नेजीवःसुखेशुक्रोबुधःकर्मण्यथोरविः ॥ रविजःसहजेनूनंशतायुःस्यात्तदागृहं ॥ ५८ ॥

अर्थः—लग्नीं गुरु, ४ थेस्थानीं शुक्र, दशमस्थानीं बुध, ६ स्थानीं रवि, ३ स्थानीं शनि अशा शुभ लग्नीं गृहारंभ केला असतां त्या गृहाचें आयुष्य १०० वर्षें जाणावें.

भृगुर्लग्नेबुधोव्योम्निलाभेऽर्कःकेंद्रगोगुरुः ॥ यस्यारंभेचतस्यायुर्वत्सराणांशतद्वयम् ॥ ५९ ॥

अर्थः—लग्नीं शुक्र, १० स्थानीं बुध, ११ स्थानीं रवि आणि केंद्रीं गुरु, असे गृहारंभ लग्नीं ग्रह असले तर त्या गृहाचें आयुष्य २०० वर्षें जाणावें.

## गृहायुष्य प्रमाण.

जीवोबुधोभृगुव्योम्निलाभगौभानुभूमिजौ ॥ प्रारंभेयस्यतस्यायुःसमाशीतिःसहश्रियः ॥ ६०

अर्थः—बृहस्पति अथवा बुध किंवा शुक्र दशमस्थानीं आणि रवि, भौम एकादशस्थानीं गृहारंभास आले तर तें गृह लक्ष्मीसहित ८० वर्षें नांदेल.

स्वोच्चवर्तिनिभृगौविलग्नगेदेवमंत्रिणिरसातलेऽथवा ॥ स्वोच्चगेरविसुतेऽथवायगेस्यात्स्थितिश्चसुचिरंसहश्रिया ॥ ६१ ॥

अर्थः—लग्नीं शुक्र, चतुर्थस्थानि गुरु, आणि एकादशस्थानीं शनि असे असून स्वोचस्थानीं लग्नीं असतां घरास आरंभ केला तर तें गृह चिरकाळ लक्ष्मी युक्त असें असेल.

स्वर्क्षगेहिमगौलाभेसुरेज्येकेंद्रसंस्थिते ॥ धनधान्यसुतारोग्ययुजंधामचिरंभवेत् ॥ ६२ ॥

अर्थः—कर्कीचा चंद्र एकादशस्थानीं आणि गुरु केंद्रस्थानीं असायोग लग्नीं असला तर धन, धान्य, सुत आणि आरोग्य यांहीं करून युक्त तें गृह चिरकाल राहील.

## अन्यमतें पृथ्वी शोधण्याचा प्रकार.

कुंडार्थपृथ्वीपारिशोधहेतवेप्रष्टुर्मुखाद्यःप्रथमंस्फुटीभवेत् ॥ वर्गादिवर्णःकिलतद्दिशिस्मृतंशल्यंमुनींद्रैर्ह्यपर्यैस्तुमध्यतः ॥ ६३ ॥ स्मृत्वेष्टदेव-

तांप्रष्टुर्वचनस्याद्यमक्षरं ॥ गृहीत्वातुततःश-
ल्याशल्यंसस्यग्विचार्यते ॥ ६४ ॥

अर्थः—कुंडार्थ अथवा नूतन गृह करण्यास प्रथम जागा शोधण्याचा प्रकार. पृच्छकानें इष्टदेवतांचें स्मरण करून विप्रास प्रश्न करावा. विप्रानें पृच्छकाच्या मुखांतून ज्या वर्गांतील आदि अक्षर येईल त्याचें उत्तर अ क च ट त प य श वर्ग पूर्वादि अष्टदिशांस आणि मध्यभागीं ह प य वर्गांचें आदि अक्षर येईल त्या जाग्यांत अमुक शल्य आहे त्याचा प्रकार खालीं लिहिला आहे त्यावरून फलश्रुती त्या त्या जागीं पहावी.

## प्रश्नाक्षर फळें.

पृच्छायांयदिअःप्राच्यांनरशल्यंतदाभवेत् ॥ सा-
र्धहस्तप्रमाणेनतच्चमानुषमृत्युकृत् ॥ ६५ ॥
आग्नेय ॥ आग्नेय्यांदिशिकःप्रश्नेखरशल्यंकरद्व-
ये ॥ राजदंडोभवेत्तत्रभयंनैवविवर्तते ॥ ६६ ॥
दक्षिण ॥ याम्यायांदिशिचःप्रश्नेतदास्यात्कटि-
संस्थितं ॥ नरशल्यंगृहेतस्यमरणंचिररोग-
तः ॥ ६७ ॥ नैर्ऋत्य ॥ नैर्ऋत्यांयदिटःप्रश्ने-
सार्धहस्तादधःस्थले ॥ शुनोऽस्थिजायतेतस्य-
बालानांजायतेमृतिः ॥ ६८ ॥ पश्चिम ॥ पश्चि-
मायांतुतःप्रश्नेशिशोःशल्यंप्रजायते ॥ सार्धह
स्तेगृहस्वामीनातिष्ठतिसदागृहे ॥ ६९ ॥ वाय-
व्य ॥ वायव्यांदिशिपःप्रश्नेतुषांगाराश्चतुःकरे ॥
कुर्वंतिमित्रनाशंचसदादुःस्वप्नदर्शनं ॥ ७० ॥
उत्तर ॥ उदीच्यांदिशियःप्रश्नेविप्रशल्यंकटेरधः ॥
तच्छीघ्रंनिर्धनत्वायकुबेरसदृशस्यहि ॥ ७१ ॥ ई-
शान्यईशान्यांयदिशःप्रश्नेगोशल्यंसार्धहस्ततः ॥

तद्गोधनस्यनाशायजायतेगृहमेधिनः ॥ ७२ ॥ मध्यभागीं ॥ हपयामध्यकोष्ठेचवक्षोमात्रंभवेदधः ॥ नृकपालमथोभस्मलोहंतत्कुलनाशकृत् ॥ ७३ ॥

अर्थः—पृच्छकाचे मुखांतून अवर्गाचें आदि अक्षर आलें तर पूर्वेचे कोष्ठकांत दीड हात ओंड खणलें असतां नराची हाडें सांपडतील, तीं न काढल्यास मृत्युकारक होत. १; क वर्गाचें आदि अक्षर आल्यास आग्नेय कोणीं २ हात ओंडावर खराच्या अस्थि सांपडतील त्या न काढल्यास राजदंडा पासून भयनिवृत्ति होणार नाहीं.२; च अक्षर आल्यास दक्षिणेस कंबरेबरावर ओंड खणावें नराच्या अस्थि सांपडतील त्या न काढल्यास चिरकाल रोगानें मरण प्राय दुःख. ३; ट अक्षर आल्यास एक हातावर कुत्र्याच्या अस्थि सांपडतील, त्या न काढल्यास मुलें वांचणार नाहींत. ४; त अक्षर आल्यास मुलाचीं हाडें दीड हातावर सांपडतील ती न काढल्यास त्या घरांत गृहस्वामीचें वास्तव्य होणार नाहीं. ५ प अक्षर आल्यास वायव्य कोणास ४ हातावर तूस ( कोंडा ) व कोळसे सांपडतील ते न काढल्यास मित्र नाश व नित्य दुःस्वप्नदर्शन होईल. ६; य अक्षर आल्यास उत्तरेस एक हातावर ब्राम्हणाच्या अस्थि सांपडतील, त्या न काढल्यास कुबेरा सारखा धनवान् असला तरी दरिद्री होईल. ७; श अक्षर आल्यास ईशान्य कोणीं दीड हातवर गाईच्या अस्थि सांपडतील त्या न काढल्यास गोधनाचा नाश होईल.८; ह प य मध्य भागीं छातीभर ओंडविर नराचें कपाळ व भस्म लोह सांपडेल तें न काढलें तर कुळाचा नाश होईल. ९ याप्रकारें ज्या वर्गातील नांव येईल त्या दिशेस पहावें आणि वर्णाचें आदि अक्षर पृच्छकाचे मुखांतून या वर्णाशिवाय आदि अक्षर आल्यास त्याचें फळ कांहीं घेऊं नये.

## यात्राप्रकरण.

### सन्मुख शुक्र.

एकग्रामेपुरेवापिदुर्भिक्षेराष्ट्रविप्लवे ॥ विवाहेतीर्थयात्रायांप्रतिशुक्रोनविद्यते ॥ १ ॥

अर्थः—गांवचे गांवांत अथवा शहराचे शहरांत, दुर्भिक्षकाळीं, राजाचें भरणें येतें त्यास, विवाह समयीं तीर्थयात्रेस सन्मुख शुक्राचा दोष नाहीं.

पौष्णाद्वाग्निपादांतंयावत्तिष्ठतिचंद्रमाः ॥ ताव-
च्छुक्रोभवेदंधःसन्मुखंगमनंशुभम् ॥ २ ॥

अर्थः—रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, या नक्षत्रांचे प्रथम चरणीं चंद्र आला म्हणजे शुक्र अंध असतो तो गमन कालीं सन्मुख असला तरीं दोष नाहीं.

## शुभाशुभ फळ.

दक्षिणेदुःखदःशुक्रःसन्मुखोहंतिमंगलं ॥ वामेपृ-
ष्ठेशुभोनित्यंरोधयेदस्तगःशुभः ॥ ३ ॥

अर्थः—बाहेर जातांना शुक्र दक्षिणेस दुःखदायक, सन्मुख कार्यहानि, वामभागीं किंवा पृष्ठभागी घेऊन गमन केलें असतां शुभ होय. पूर्वेस अस्त असला तर पश्चिमेस शुभ, आणि पश्चिमेस अस्त असल्यास पूर्वेस शुभ जाणावा.

## घातचंद्र.

प्रयाणकालेयुद्धेचकृषौवाणिज्यसंग्रहे ॥ वादेचै-
वगृहारंभेवर्जयेत्घातचंद्रमः ॥ ४ ॥

अर्थः—यात्रेस जातांना, युद्धास, कृषि करण्यास, व्यापारास धान्यादि संग्रहास, वादाचे समयीं आणि गृहारंभास घातचंद्र वर्ज करावा.

## घाततिथ्यादि.

घाततिथिर्घातवारोघातनक्षत्रमेवच ॥ यात्रायां
वर्जयेत्प्राज्ञैरन्यकर्मसुशोभनं ॥ ५ ॥ ॥

अर्थः—गमन कालीं घातवार, घातनक्षत्र आणि घाततिथि अशीं वर्जावीं अन्य कर्मास शुभ.

मेषेरविर्मघाप्रोक्ताषष्ठीप्रथमचंद्रमाः ॥ वृषभेपं-
चहस्तश्चतुर्थीशनिरेवच ॥ ६ ॥ मिथुनेनवमी
स्वातीअष्टमीचंद्रवासरः ॥ कर्केद्विरनुराधाचबुधं
षष्ठींविवर्जयेत् ॥ ७ ॥ सिंहेषष्ठश्चंद्रमाश्चदश-

मींशानिमूलकं ॥ कन्यायांदशमश्चंद्रः श्रवणः शनिरष्टमी ॥ ८ ॥ तूलेगुरुर्द्वादशीस्याच्छतंतृतीयचंद्रमाः ॥ वृश्चिकेरेवतीसप्तदशमभिभार्गवस्तथा ॥ ९ ॥ धनेचतुर्थोभरणीद्वितीयाभार्गवस्तथा ॥ मकरेऽष्टमोरोहिणीचद्वादशीभौमवासरः ॥ १० ॥ कुंभेएकादशचाद्रश्चतुर्थीगुरुवासरः ॥ मीनेचद्वादशःसार्पद्वितीयाभार्गवस्तथा ॥ ११ ॥

| रा. | मेष. | वृष. | मिथु. | कर्क. | सिंह. | कन्या. | तूळ. | वृश्चि. | धन. | मकर | कुंभ. | मीन. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र. | १ | ५ | ९ | २ | ६ | १० | ३ | ७ | ४ | ८ | ११ | १२ |
| वार. | रवि. | शनि | सोम. | बुध. | शनि | शनि. | गुरु. | शुक्र. | शुक्र. | भौम. | गुरु. | शुक्र. |
| नक्ष. | मघा. | हस्त. | स्वा० | अनु. | मूळ. | श्रव० | शत० | रेव० | भर. | रोहि. | आर्द्रा | आश्ले |
| तिथि | ६ | ४ | ८ | ६ | १० | ८ | १२ | १० | २ | १२ | ४ | २ |

या प्रकारें मेषादि द्वादश राशिपरत्वें घातचतुष्टय स्वराशिस वर्जून प्रयाण करावें.

## राशिपरत्वें कालचंद्र.

मेषेवेदोवृषेष्टौचमिथुनेचतृतीयकः ॥ दशकर्केरविःसिंहेकन्यायांकःप्रकीर्तितः ॥ १२ ॥ षट्तूलेवृश्चिकेखेंदुर्धनेरुद्राःप्रकीर्तिताः ॥ मकरेऋषयःप्रोक्ताःकुंभेबाणाउदाहृताः ॥ मीनेअंघ्रिःकालचंद्राःशौनकश्चेदमब्रवीत् ॥ १३ ॥ ॥

अर्थः—मेष राशीस ४ था चंद्र, वृषभास ८ वा, मिथुनास ३ रा, कर्कास १०वा, सिंहास १२वा कन्येस ९वा, तूळास ६वा, वृश्चिकास १०वा, धनास ११ वा, मकरास ७ वा, कुंभास ५ वा, मीनास ४ था या प्रकारें राशिपरत्वें कालचंद्र शौनकमतें आहे. तो सर्व कर्मास वर्ज करावा.

## तिथिपरत्वें लग्नें वर्ज्य करावीं तीं.

नंदायामलिहर्योस्तुतुलामकरयोस्तथा ॥ भद्रायां मीनधनुषोकालस्तिष्ठतिसर्वदा ॥ १४ ॥ जयायां स्त्रीमिथुनयोःरिक्तायांमेषकर्कयोः ॥ पूर्णायांकुंभ-वृषयोर्मनुष्यमरणंध्रुवं ॥ १५ ॥

अर्थः—नंदातिर्थीस वृश्चिक सिंह, तूल, मकर, हीं लग्नें आणि भद्रा ति-र्थीस मीन, धन व जयातिर्थीस कन्या, मिथुन व रिक्तातिर्थीस मेष, कर्क व पूर्णातिर्थीस कुंभ, वृषभ या तिर्थीस हीं लग्नें वर्जावीं. तेथें काळ उभा अ-सतो यास्तव न वर्जिल्यास मनुष्य मरण पावेल.

## प्रयाणास उक्त नक्षत्रें.

हस्तेंदुमैत्रश्रवणाश्विनितिष्यपौष्णश्रविष्ठाचपुनर्व-सूच ॥ प्रोक्तानिधिष्ण्यानिनवप्रयाणेत्यक्तात्रिपं-चादिमसप्तताराः ॥ १६ ॥

अर्थः—हस्त, मृग, अनुराधा, श्रवण, अश्विनी, पुष्य, रेवती, धनिष्ठा, पुनर्वसु हीं नऊ नक्षत्रें प्रयाणास उक्त परंतु ३।५।१।७ या तारा गमना-सवर्ज्य कराव्या.

## मध्यम नक्षत्रें.

रोहिणीउत्तराचित्रामूलमार्द्रातथैवच ॥ षाढोत्त-राभाद्रविश्वेप्रस्थानेंमध्यमाःस्मृताः ॥ १७ ॥

अर्थः—रोहिणी, उत्तरा, चित्रा, मूळ, आर्द्रा, उत्तराभाद्रपदा, उत्तरा-षाढा, पूर्वाषाढा हीं नक्षत्रें प्रयाणास मध्यम होत.

## वर्ज्य नक्षत्रें.

त्रीणिपूर्वामघाज्येष्ठाभरणीजन्मकृत्तिका ॥ सार्प स्वातीविशाखासुगमोनित्यंविवर्जयेत् ॥ १८ ॥ कृत्तिकाएकविंशत्योभरण्याः सप्तनाडिकाः ॥ एकादशमघायाश्चत्रिपूर्वाणांचषोडश ॥ १९ ॥

विशाखासार्पचित्रार्द्रास्वातिभेषुचतुर्दश ॥ आ-
द्यास्तुघटिकास्त्याज्याःशेषांशेगमनंशुभं ॥ २० ॥

अर्थः—संकट समयास तिन्हीं पूर्वा यांच्या सोळा सोळा घटिका; मघा २१ घटिका; ज्येष्ठा संपूर्ण; भरणी ७ घटिका, कृत्तिका २१ घटिका; जन्म नक्षत्र संपूर्ण; आश्लेषा विशाखा, चित्रा, स्वाती, आर्द्रा यांच्या आद्य चवदा चवदा घटी प्रमाणें सर्व वर्ज्य घटी टाकून प्रयाण करावें.

## प्रयाणास शुभाशुभ वार.

अर्केक्लेशमनर्थकंचगमनेसोमेचबंधुप्रियंचांगारेऽ
नलतस्करज्वरभयंप्राप्नोतिचार्थंबुधे ॥ क्षेमारोग्य-
सुखंकरोतिचगुरौलाभश्चशुक्रेशुभोमंदेबंधनहा-
निरोगमरणान्युक्तानिगर्गादिभिः ॥ २१ ॥

अर्थः—रविवारीं गमन केलें असतां मार्गीं महा क्लेश व अनर्थ प्राप्त होतात. सोमवारीं बंधु आणि प्रिय यांचें दर्शन, मंगळवारीं अग्नि, चोर व ज्वर यांपासून भय. बुधवारीं द्रव्यप्राप्ति. गुरुवारीं क्षेम, आरोग्य व सुख यांची प्राप्ति. शुक्रवारीं लाभ व शुभफल प्राप्ति. शनिवारीं बंधन, हानि, रोग, व मरण यांची प्राप्ति.

## होराकथन व शकुन.

वारात्षष्ठस्यषष्ठस्यहोरासार्धद्विनाडिका ॥ अर्कः
शुक्रोबुधश्चंद्रोमंदोजीवधरासुतः ॥ २२ ॥ गुरु-
र्विवाहेगमनेचशुक्रोबोधेसौम्यःसर्वकार्येषुचंद्रः ॥
कुजेचयुद्धंरविराजसेवामंदेचवित्तंत्वितिहोरयोगाः
॥ २३ ॥ यस्यग्रहस्यवारेपिकर्मकिंचित्प्रकीर्तितं ॥
तस्यग्रहस्यहोरायांसर्वकर्मविधीयते ॥ २४ ॥

अर्थः—ज्या वाराचा त्या वारीं प्रथम २॥ घटिका होरा. त्यांपासून सहावे वाराचा दुसरा होरा, या क्रमानें दिवसाचे १२ होरे जाणावे. २॥ घटिका प्रथम रविवाराचा होरा राजसेवेस उक्त. द्वितीय २॥ घटिका शुक्राचा गमनास. तृतीय बुधाचा ज्ञानप्राप्तीस. चतुर्थ २॥ घटिका चंद्राचा तो सर्व कार्यास. पांचवा शनीचा द्रव्यसंग्रहास. सहावा गुरूचा विवाहास. ७ वा मं-

गळाचा मुद्दास जाण्यास उक्त या प्रकारें क्रम जाणावा. आणि ज्या ज्या ग्रहाचा जो जो वार त्यांचीं कृत्यें पूर्वी कथिलीं आहेत तीं त्या त्या वाराचे होऱ्यावर करावी.

## सूर्याचा होरा.

सूर्यस्यहोरेरजकीसुवस्त्रंकुमारिकाविप्रचतुष्ठयंच काकत्रयंद्वौनकुलौतथैवचाषस्तथैकोवृषभस्तुगो-श्च ॥ २५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

अर्थः—रवीच्या होऱ्यावर गमन केलें असतां पुढें शकून होतील ते सांगतों:—परीट, स्वच्छ वस्त्रें, कुमारिका, चार ब्राह्मण, तीन कावळे, दोन मुंगुस, दोन चाष, एक बैल, आणि गाय यांतून कांहीं तरी शकून भेटतील.

## चंद्राचा होरा.

चंद्रस्यहोरेद्विजयुग्मकाकभेरीमृदंगानकुलःखरो-ष्ट्रौ ॥ हयश्चगौर्मेषशुनस्तथैवपुष्पाणिनारीद्व-यमेवमार्गे ॥ २६ ॥

अर्थः—चंद्राचे होऱ्यावर गमन केलें असतां मार्गाचे ठायीं दोन ब्राह्मण, काक, नगारे, मृदंग, मुंगूस, गाढव, उंट, घोडा, गाय, मेंढा, कुत्रें, पुष्पें आणि दोन स्त्रिया यांतून कांहीं भेटावीं.

## मंगळाचा होरा.

मार्जारयुद्धंकलहःकुटुंबेरजस्वलास्त्रीभवनस्यदा-हः ॥ नपुंसकःश्वात्रितयंद्विजश्चनग्नोविमुक्तोध-रणीसुतस्य ॥ २७ ॥

अर्थः—मंगळाचे होऱ्यावर गेलें असतां मार्जाराचें युद्ध, स्त्री पुरुषांचा कलह, रजस्वलास्त्री, घर जळतें, नपुंसक, तीन कुत्री किंवा नग्न ब्राह्मण भेटेल.

## बुधाचा होरा.

बुधस्यहोरेशकुनश्चसर्वेःस्त्रीपुत्रयुक्ताकलशश्चपू-र्णः ॥ सुचातकश्चाषगजौकुमारःपुष्पाणिनारी खलुदर्पणंच ॥ २८ ॥

अर्थः—बुधाचे होऱ्यावर सर्व शकून स्त्रीपुत्रयुक्त, पाण्यानें भरलेला कलश, चातकपक्षी, चाषपक्षी, गज, कुमार, पुष्पें, स्त्री, आरसा यांतून कांहीं तरी भेटतील.

## गुरुचा होरा.

गुरोर्द्विजातिर्गणिकाचधेनुःस्त्रीबालयुक्तासजलो-घटस्तु ॥ ऊर्णाचकाकोनकुलोबकश्चहंसस्यरा-जाबहवश्चवैश्याः ॥ २९ ॥

अर्थः—गुरूचे होऱ्यावर गमन केलें तर मार्गाचे ठायीं ब्राह्मण, कलवंतीण, गाय, मुलासहित स्त्री, भरलेली घागर, धावळी, काक, मुंगूस, बगळे हंसाचा राजा, बहुत वाणी यांतून कांहीं भेटतील.

## शुक्राचा होरा.

शुक्रस्यहोरेगणिकाद्विजेंद्रःकाकत्रिकंचाथनपुं-सकोवा ॥ मद्यंचमांसंगणकश्चधेनुर्धान्यंचशूद्र-त्रितयंचवैश्यः ॥ ३० ॥

अर्थः—शुक्राचे होऱ्यावर प्रथम ब्राम्हण, कलावंतीण, तीन कावळे, नपुंसक, मद्य, मांस, गणक ( जोशी ), गाय, वाणी, धान्य, तीन शूद्र यांतून कोणी तरी भेटतील.

## शनीचा होरा.

पतंगसूनोर्यवनश्चनग्नोरजस्वलास्त्रीमृतकंत-थैव॥ पिशाचगृध्रौविधवाचवन्हिर्नपुंसकश्चा-थयुवाप्रचंडः ॥ ३१ ॥

अर्थः—शनीचे होऱ्यावर नग्न यवन, रजस्वला स्त्री, मेत, पिशाच, गृध्र पक्षी, विधवा स्त्री, अग्नि, नपुंसक, तरुण असून बळकट असा पुरुष यांतून कोणी तरी भेटेल याप्रमाणें शकुन जाणावे.

## मनूचें वाक्य.

गमनंप्रतिराज्ञस्तुसन्मुखादर्शनेनतु ॥ प्रश-स्ताश्चैवसंभाषाःसर्वानेतांश्चकीर्तयेत् ॥ ३२ ॥

अर्थः–राज गमन काळीं पूर्वी शकुन सांगितले ते किंवा उत्तम भाषणें यांचे श्रवण, दर्शन न झालें तर त्यांचें मनांत स्मरण करून गमन करावें शुभ होय.

## वारपरत्वें वस्त्र धारण.

रवौनीलंबुधेपीतंकृष्णवर्णंशनैश्चरे ॥ श्वेतंगुरौ भृगौभौमेरक्तंसोमेतुचित्रकं ॥ ३३ ॥

अर्थः—रविवारीं निळें, बुधवारीं पिंवळें, शनिवारी काळें, गुरुवारीं आणि शुक्रवारी पांढरें, मंगळवारीं तांबडें आणि सोमवारीं चित्रवर्ण याप्रकारें वस्त्र धारण करून गमन करावें.

## नक्षत्र तिथिवार परत्वें दिक्शूलवर्ज्य.

### पूर्व दिशा.

मूलश्रवणशाक्रेषुप्रतिपन्नवमीषुच ॥ शनौसोमे बुधेचैवपूर्वस्यांगमनंत्यजेत् ॥ ३४ ॥

अर्थः—मूळ, श्रवण, ज्येष्ठा, हीं नक्षत्रें आणि प्रतिपदा, नवमी या तिथी आणि शनिवार, सोमवार, बुधवार यांवर पूर्वेस गमन करूं नये.

### दक्षिण दिशा.

पूर्वाभाद्रपदाश्वीनीपंचमीचत्रयोदशी ॥ गुरुर्धनिष्ठार्द्राचैवयाम्येसप्तविवर्जयेत् ॥ ३५ ॥

अर्थः–पूर्वाभाद्रपदा, अश्विनी आणि तिथी पंचमी, त्रयोदशी, गुरुवार, धनिष्ठा, आर्द्रा हीं सात दक्षिण दिग्गमनास वर्ज करावीं.

### पश्चिम दिशा.

रोहिण्यांचतथापुष्येषष्ठीचैवचतुर्दशी ॥ भौमार्कगुरुवारेषुनगच्छेत्पश्चिमांदिशं ॥ ३६ ॥

अर्थः–रोहिणी, पुष्य, षष्ठी, चतुर्दशी, मंगळ, रवि, गुरु, हे वार यांवर पश्चिम दिशेस गमन वर्जावें.

## उत्तर दिशा.

करेचोत्तरफाल्गुन्यांद्वितीयादशमीतथा ॥ बुधे रवौभानुवारेनगच्छेदुत्तरांगतिं ॥ ३६ ॥

अर्थः—हस्त, उत्तरा फा० आणि द्वितीया दशमी व बुध, रवि भौम हेवार यांवर उत्तर दिशेस गमन वर्जावें.

## विदिक् शूल.

ईशान्यांज्ञशनौशूलेआग्नेय्यांगुरुसोमयोः ॥ वायव्यांभूमिपुत्रस्यनेर्ऋत्यांशुक्रसूर्ययोः ॥ ३८ ॥

अर्थः—वार परत्वें शूल विदिशांस असतो ती दिशा त्या वारीं गमनास वर्जावी. बुध आणि शनि या वारीं ईशान्य दिशेस गमन वर्जावें; गुरु आणि सोम या वारीं आग्नेयेस वर्जावें; भौमवारीं वायव्येस आणि शुक्र, रवि या वारीं नैर्ऋत्येस गमन वर्जावें.

## शूलदोष निवारणार्थ पदार्थ भक्षण करणें.

सूर्यवारेघृतंपीत्वासोमवारेपयस्तथा ॥ गुडमंगारवारेतुबुधवारेतिलानपि ॥ ३९ ॥ गुरुवारेदधिज्ञेयंशुक्रवारेयवानपि ॥ माषान्भुत्काशनेर्वारेशूलदोषोपशांतये ॥ ४० ॥ ॥

अर्थः—रविवारीं घृत, सोमवारीं पय ( दूध ) हीं प्राशन करावीं. मंगळवारीं गूळ व बुधवारीं तीळ खावे. गुरुवारीं दधि ( दहीं ) प्राशन करावें. शुक्रवारीं यव ( सातू ) खावे. शनिवारीं उडीद भक्षण करावे असें वारपरत्वें भक्षण करून गमन करावें.

## कुंभ मीन गतचंद्रावर वर्ज्य कर्में.

शय्यावितानप्रेताग्निक्रियाकाष्टतृणार्जनं ॥ याम्यदिग्गमनंकुर्यान्नचंद्रेकुंभमीनगे ॥ ४१ ॥

अर्थः—पलंग बाज इत्यादि विणणें, प्रेताग्निकर्म, काष्ठ व तृण यांचा संग्रह आणि दक्षिण दिशेस गमन हीं सकल कर्मे कुंभ व मीन या राशींच्या चंद्रावर वर्जावीं.

## सन्मुख चंद्र.

करणभगणदोषंवारसंक्रांतिदोषंकुतिथिकुलिक-
दोषंयामयामार्धदोषं ॥ कुजशनिरविदोषंराहु-
केत्वादिदोषंहरतिसकलदोषं चंद्रमासन्मुख-
स्थः ॥ ४२ ॥

अर्थः—करण, नक्षत्र, वार, संक्रांति, कुतिथि, यामार्ध, मंगळ, शनि, रवि, राहु, केतु, इत्यादि दोष सन्मुख चंद्र घेऊन गमन केलें असतां जातात.

## दिशापरत्वें सन्मुख चंद्र.

मेषेचसिंहेधनपूर्वभागेवृषेचकन्यामकरेचयाम्ये॥
तूलेचकुंभेमिथुनेप्रतीच्यांकर्कालिमीनेंदिशिचो-
त्तरस्यां ॥ ४३ ॥ ॥ फल श्लोक ॥ सन्मुखोअर्थ-
लाभायदक्षिणेसुखसंपदः॥ पृष्ठतःप्राणनाशाय
वामेचंद्रेधनक्षयः ॥ ४४ ॥

अर्थः—मेष, सिंह, धन, या राशींचा चंद्र पूर्वेस; वृषभ, कन्या, मकर यांचा दक्षिणेस; तूळ, कुंभ, मिथुन, यांचा पश्चिमेस; कर्क, वृश्चिक, मीन या राशींचा चंद्र उत्तरेस; फलः—सन्मुख चंद्र घेऊन गमन केलें असतां अर्थलाभ होईल. आणि उजवे बाजूस घेतला तर सुख व संपत्ति प्राप्त होतील. पृष्ठभागीं घेतला तर प्राणनाश होय आणि वामभागीं घेऊन गमन केलें तर धनक्षय जाणावा.

## काळवेळा पाहणें.

पूर्वाण्हेचोत्तरांगच्छेत्प्राच्यांमध्यान्हकेतथा ॥ द-
क्षिणेअपराण्हेतुपश्चिमेअर्धरात्रके ॥ ४५ ॥

अर्थ—दिवसा प्रथम प्रहरीं उत्तरेस; द्वितीय प्रहरीं मध्यान्हीं पूर्वेस; तृतीय प्रहरी अपराण्ही दक्षिणेस; आणि अर्धरात्री पश्चिमेस गमन करावें उक्त होय.

## दिशापरत्वें योगिनी.

प्रतिपन्नवमीपूर्वेद्वितीयादशचोत्तरे ॥ तृतीयैका-

दशीवन्हौचतुर्द्वादशिनैर्ऋते ॥ ४६ ॥ पंचत्रयो-
दशीयाम्येषष्ठीभूतंचपश्चिमे ॥ सप्तमीपूर्णवाय-
व्येअमावास्याष्टमीशिवे ॥ ४७ ॥ फळ ॥ पृ-
ष्ठेचशुभदाप्रोक्तावामेचैवाविशेषतः ॥ योगिनी
साभवेन्नित्यंप्रयाणेशुभदानृणां ॥ ४८ ॥

अर्थः—प्रतिपदा, नवमी या तिथींस योगिनी पूर्वेस. द्वितीया, दशमी उत्तरेस. तृतीया एकादशी आग्नेयेस. चतुर्थी, द्वादशी नैर्ऋत्येस. पंचमी, त्रयोदशी दक्षिणेस. षष्ठी चतुर्दशी पश्चिमेस. सप्तमी, पूर्णिमा वायव्येस आणि अष्टमी अमावास्या ईशान्येस याप्रमाणें योगिनी जाणाव्या. यांचें फळ योगिनी पृष्ठभागीं अथवा वामभागीं घेऊन नित्यानित्य गमन करावें शुभ होय.

## वार परत्वें काळ राहु.

अर्कोत्तरेवायुदिशाचसोमेभौमेप्रतीच्यांबुधनैर्ऋ-
तेच ॥ याम्येगुरौवन्हिदिशाचशुक्रेमंदेचपूर्वेप्र-
वदंतिकालः ॥ ४९ ॥

अर्थः—रविवारीं काळउत्तरेस, सोमवारीं वायव्येस, मंगळवारीं पश्चिमेस, बुधवारीं नैर्ऋत्येस, गुरुवारीं दक्षिणेस, शुक्रवारीं आग्नेयेस, शनिवारीं पूर्वेस, या प्रमाणें वारपरत्वें काळराहु जाणावा.

## काळराहुफळ.

रविगुरुदिनपूर्वेसोमशुक्रेचयाम्येवरुणादिशितु
भौमेचोत्तरेसौरिसंस्थे ॥ प्रतिदिनमितिगत्वा
कालराहुर्दिशानांसकलगमनकार्येवामपृष्ठेच
सिद्धिः ॥ ५० ॥ ॥

अर्थः—रवि अथवा गुरु या वारीं पूर्वेस गमन केलें असतां काळ राहु वाम पृष्ठ भागीं येतो आणि सकळ कार्यें सिद्धीस जातात. सोम आणि शुक्र या वारीं दक्षिणेस गमन करावें. भौमवारीं पश्चिमेस गमन करावें. श-
निवारीं उत्तरेस गमन करावें. तेणें करून कार्य सिद्धि होईल.

## क्षुधितराहु.

इंद्रेवायौयमेरुद्रेतोयेग्नौशशिरक्षसोः ॥ यामार्धे क्षुधितोराहुर्भ्रमत्येवंदिगष्टके ॥ ५१ ॥ नतिथि-र्नेचनक्षत्रंनयोगोनचचंद्रमाः॥ सिद्ध्यंतिसर्वका-र्याणियात्रायांदक्षिणेरवौ ॥ ५२ ॥

अर्थः—प्रथम यामार्धीं क्षुधित राहु पूर्वेस असता. द्वितीय वायव्येस. तृतीय दक्षिणेस. चतुर्थ ईशान्येस. पंचम पश्चिमेस. षष्ठ आग्नेयेस. सप्तम उत्त-रेस. अष्टम यामार्धीं नैर्ऋत्येस या प्रमाणें अष्ठ दिशा भ्रमण करतो. दक्षिण भागीं रवि घेऊन गमन केलें असतां तिथि नक्षत्रादि दोष जातात.

## काळ कोठें आहे तो पाहावा.

कालंपलंघातकलोहपातदावानलःखड्गकचोल-कांतिकाः ॥ नखाश्चतुर्विंशतिषट्तथादिक्रुद्रा-धृतिर्वेदगुणाःक्रमेण ॥ ५३ ॥ तिथ्यायुतंवैवसु-भाजितंचशेषश्चकालोमुनयोवदंति ॥ ५४ ॥ फल ॥ कालंचपृष्ठेपलसन्मुखेनघातंचलोहंवड-वाग्निपृष्ठे ॥ खड्गेचाग्रेकवचंचवामेकांतिश्चयो ज्यादिशिदक्षिणस्यां ॥ ५५ ॥

अर्थ.—कालांचीं नांवें.— काल१, पल२, घातक३, लोहपात ४, वडवानल५,
२० २४ ६ १० ११
खड्ग ६, कवच ७, कांतिक ८, अशी ८ नांवें व त्यां खालीं अंक मांडले
१८ ४ ३
आहेत ते ज्यातिथीस गमन करावयाचें असेल ती तिथी एकेक अंकांत मिळवून ८ नीं भागून शेष जे अंक उरतील त्यादिशेस तो काळ आहे अशा क्रमानें पूर्वादि अष्टदिशांस पहावें. फळ.— पृष्ठभागी काळशुभ, सन्मुख पल शुभ, पृष्ठभागीं घातक, लोहपात, वडवानल, हे तिन्हीं शुभ, अग्रभागी खड्ग शुभ, वामभागी कवच शुभ, आणि दक्षिण भागीं कांतिक शुभ अशी दिशा परत्वें शुभ फळें पाहून त्यादिशेस युद्धांत अथवा यात्रादि कार्यास गमन क-रावें. तेणें करून कार्य सिद्धि होईल,

## पंथा राहु चक्र.

स्युर्धर्मेदस्रपुष्योरगवसुजलपद्वीशमैत्राण्यथार्थे
याम्याजांघ्रींद्रकर्णादितिपितृपवनोडून्यथोभानि
कामे ॥ वन्हयार्द्राबुध्न्यचित्रानिर्ऋतिविधिभगा-
ख्यानिमोक्षेथरोहिण्यर्यम्णाविंदुविश्वांतिमभदि-
नकरर्क्षाणिपंथादिराहो ॥ ५६ ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धर्म. | आश्विनी. | पुष्य. | आश्लेषा. | विशाखा. | अनुराधा. | धनिष्ठा. | शततारका. |
| अर्थ. | भरणी. | पुनर्वसू. | मघा. | स्वाती. | ज्येष्ठा. | श्रवण. | पूर्वाभाद्रपदा. |
| काम. | कृत्तिका | आर्द्रा. | पूर्वा. | चित्रा. | मूळ. | अभिजि. | उत्तराभा. |
| मोक्ष. | रोहिणी. | मृगशिर. | उत्तरा. | हस्त. | पूर्वाषाढा. | उत्तरापा. | रेवती. |

अर्थ.—नक्षत्रें २८ त्यांचे भाग ४ त्यांचीं नांवें. प्रथम भाग धर्ममार्गांचीं नक्षत्रें ७, द्वितीय अर्थमार्गांचीं नक्षत्रें ७, तृतीय काममार्गाचीं नक्षत्रें ७, चतुर्थ मोक्षमार्गाची नक्षत्रें ७ याप्रमाणेंच चहूं मार्गांचीं नक्षत्रें जाणावीं. त्यांत एक मार्गाचे नक्षत्री सूर्य असतां चंद्र चहूं मार्गाचे नक्षत्री फिरेल त्याचीं फळें सां०

### धर्ममार्गाचीं फळें.

धर्ममार्गेगतेसूर्येअर्थांशेचंद्रमायदि ॥ तदाशत्रु-
भयंतस्यज्ञेयंतुविबुधैःस्मृतम् ॥ ५७ ॥

अर्थ.—धर्म मार्ग नक्षत्रीं सूर्य असतां अर्थ मार्ग नक्षत्रीं चंद्र आल्यास गमन केलें तर मार्गाचे ठायीं शत्रु भय होईल. असें अशुभ फल जाणावें.

धर्ममार्गेगतेसूर्येकामांशेचंद्रमायदि ॥ विग्रहंदा-
रुणंचैवचौराकुलसमुद्भवं ॥ ५८ ॥

अर्थ.—धर्म मार्गीं सूर्य आणि काम मार्ग नक्षत्रीं चंद्र असे योगाचें फळ वैर पुष्कळांशीं होईल आणि चोरापासून भय प्राप्त होईल.

धर्ममार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥ संहारश्च
भवेतत्रभंगोहानिःप्रजायते ॥ ५९ ॥

अर्थ.—धर्म मार्ग नक्षत्रीं सूर्य असतां व चंद्र असतां गमन केलें तर संहार, भंग आणि हानि असें प्राप्त होईल.

धर्ममार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षगतेयदि ॥ गृहलाभो भवेत्तस्याविज्ञेयोनात्रसंशयः ॥ ६० ॥

अर्थ.—धर्म मार्गी सूर्य आणि मोक्ष मार्गी चंद्र असतां त्या योगाचें फळ गृह लाभ व मार्गी सुख प्राप्त होईल.

## अर्थ मार्गाचीं फळें.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मस्थितेयदि ॥ गजलाभो भवेत्तस्यतत्रश्रीः सर्वतोमुखी ॥ ६१ ॥

अर्थ.—अर्थ मार्गी सूर्य आणि धर्म मार्ग नक्षत्रीं चंद्र अशा योगाचें फळ गजलाभ व लक्ष्मी प्राप्ति होईल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥ प्रथमंजायतेकार्यंतत्रभंगोभविष्यति ॥ ६२ ॥

अर्थ.—अर्थ मार्गी सूर्य आणि चंद्र अशा योगाचें फल प्रथम कार्य सिद्धि होईल. नंतर भंग पावेल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेकामांशसंस्थिते ॥ सर्वसिद्धिर्भवेत्तस्यजानीयान्नात्रसंशयः ॥ ६३ ॥

अर्थ.—अर्थ मार्गी सूर्य आणि काममार्गी चंद्र आला तर अशा योगाचें फळ सर्व कार्य सिद्धि होईल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षस्थितेयदि ॥ भूमिलाभोभवेतस्यहर्षयुक्तः सुखीभवेत् ॥ ६४ ॥

अर्थ.—अर्थ मार्गी सूर्य आणि मोक्षमार्गी चंद्र अशा योगाचें फळ भूमि लाभ व हर्षयुक्त होत्साता मार्गाचे ठायी सुख पावेल.

## काम मार्गाचीं फळें.

काममार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मेचसंस्थिते ॥ गजाश्वाश्चैवलभ्यंतेराजसन्मानसंभवात् ॥ ६५ ॥

अर्थ.—काम मार्गी सूर्य आणि धर्म मार्गी चंद्र आला तर हत्ती, घोडे यांचा लाभ राज सन्मानापासून प्राप्त होईल.

कामगार्गेगतेसूर्येचंद्रेचैवार्थसंस्थिते ॥ सफलं
जायतेतस्यविघ्नभंगोविनिर्दिशेत् ॥ ६६ ॥

अर्थ.—काममार्गी सूर्य आणि अर्थ मार्गी चंद्र आला असतां सकल विघ्नें नाश पावतील.

काममार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते॥ विग्रहंदारुणंचैवकार्यनाशंविनिर्दिशेत् ॥ ६७ ॥

अर्थ.—काम मार्गी सूर्य आणि चंद्र आले तर वैर फार पडेल. व कार्य नाश होईल.

काममार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षगतेपिवा ॥ राजलाभोभवेत्तस्यस्वर्णलाभंविनिर्दिशेत् ॥ ६८ ॥

अर्थ.—काम मार्गी सूर्य आणि मोक्षमार्गी चंद्र आला तर राजापासून लाभ व सुवर्ण लाभ होईल.

## मोक्ष मार्गाचीं फळें.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मस्थितेयदि ॥ हेमलाभो
भवेत्तस्यसर्वकार्यप्रसिध्यति ॥ ६९ ॥

अर्थ.—मोक्ष मार्गी सूर्य व धर्म मार्गी चंद्र आला तर सुवर्ण लाभ आणि सर्व कार्य सिद्धि होईल.

मोक्षमार्गेगतेसूर्येअर्थांशेचंद्रमायदि ॥ विफलंतस्यकार्यंचचोरराजरिपोर्भयं ॥ ७० ॥

अर्थ.—मोक्ष मार्गी सूर्य व अर्थ मार्गी चंद्र आला तर चोर, राजा व शत्रु यांपासून भय प्राप्ति आणि कार्य नाश होईल.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेकामस्थितेयदि ॥ सर्वसि
द्धिमवाप्नोतिकार्येचजयमेवच ॥ ७१ ॥

अर्थः—मोक्षमार्गी सूर्य आणि काम मार्गी चंद्र आला तर सर्व कार्यसिद्धि व जयप्राप्ति होईल.

मोक्षमार्गेंगतेसूर्यैचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥ विग्रहंदा
रुणंचैवविघ्नस्तस्यभविष्यति ॥ ७२ ॥

अर्थ.—मोक्षमार्गी सूर्य आणि धर्ममार्गी चंद्र असला तर वैर व नाना-
प्रकारें विघ्नें होतील असें जाणावें

## पंथाराहूवर कर्में करावयाचीं.

यात्रायुद्धेविवाहेचप्रवेशेनगरादिषु ॥ व्यापारेषु
चसर्वेषुपंथाराहुःप्रशस्यते ॥ ७३ ॥

अर्थ.—यात्रेस जाण्यास व युद्धांत जाण्यास, विवाहास, नगरादिकांत
प्रवेश करण्यास व व्यापारास पंथाराहु प्रशस्त होय.

## गर्गादिकांचे मुहूर्त.

उषःप्रशस्यतेगर्गःशकुनंचबृहस्पतिः ॥ अंगिरा
मनउत्साहोविप्रवाक्योजनार्दनः ॥ ७४ ॥

अर्थ.—मागील ५ घटिका रात्र राहिली ह्मणजे उषःकाल होतो तो
गर्गमुनीचे मतें प्रयाणास शुभ व बृहस्पतीचे मतें उत्तम शकुन शुभ. अंगिरा-
च्या मतें मनउत्साहकाली शुभ आणि जनार्दन मतें विप्रवाक्य शुभ.

## शुभाशुभ वाहने.

आत्मनोजन्मनक्षत्राद्दिननक्षत्रमेवच ॥ एकीकृ-
त्वाहरेद्भागंनंदशेषेचवाहनं ॥ ७५ ॥ रासभोऽ
श्वोगजोमेषोजंबुकःसिंहसंज्ञकः ॥ काकश्चैवमयू-
रश्चहंसइत्येववाहनं ॥ ७६ ॥ ॥ फल ॥ ॥ रा-
सभेअर्थनाशश्चधनलाभश्चवाजिनि ॥ लक्ष्मी-
प्राप्तिर्गजाख्येचमेषेचमरणंध्रुवं ॥७७॥ जंबूकेस्व-
ल्पलाभश्चकार्यसिद्धिश्चसिंहगे ॥ काकेचनिष्फ-
लंकार्यंमयूरेचसुखावहं ॥ ७८ ॥ हंसेतुसर्वसि-
द्धिःस्याद्वाहनानांफलंस्मृतं ॥

अर्थ.—आपल्या जन्मनक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों मोजून ९ नीं भागावें. आणि शेष उरेल त्यावरून वाहन जाणावें. शेष १ उरेल तर वाहन गाढव त्याचें फळ अर्थनाश. दोन उरले तर घोडा धनलाभ. ३ उरले तर हत्ती लक्ष्मी प्राप्ति. ४ उरले तर मेंढा मरण. ५ उरले तर कोल्हा स्वल्पलाभ. ६ उरले तर सिंह कार्यसिद्धि. ७ उरले तर कावळा निष्फळ. ८ उरले तर मयूर सुखप्राप्ति. ० उरलें तर हंस सर्वसिद्धि. या क्रमानें वाहनें जाणावीं.

## त्र्यंकमुहूर्त.

तिथयःपक्षगुणिताःसप्तभिर्भाजिताश्चताः॥ वाराःस्युर्वन्हिगुणितावसुभिश्चैवभाजिताः ॥ चतुर्गुण्यानिभान्यंकभाजितानियथाक्रमं ॥ ७९ ॥

अर्थ.—ज्या तिथीस गमन करावयाचें ती तिथि दुप्पट करून ७ नीं भागावी आणि जो वार असेल तो तिप्पट करून ८ नीं भागावा. आणि जें नक्षत्र असेल तें चौपट करून ९ नी भागावें. आणि तिहींचें शेषांक आल्यास शुभ व तिहींचें शून्य आल्यास त्र्यंक नाहींत.

## फलश्रुति.

पीडास्यात्प्रथमेशून्येमध्येशून्येमहद्भयं ॥अंत्यशून्येतुमरणंत्र्यंकेचविजयीभवेत् ॥ ८० ॥

अर्थ.—प्रथम तिथीचे भागास शून्य आलें तर पीडा. द्वितीय वाराचे भागास शून्य आलें तर मोठें भय. तिसरें नक्षत्र भागास शून्य आलें तर मरण.. ३ ठिकाणीं अंक आले ह्मणजे त्र्यंक आहे तो विजय प्राप्ति करणारा जाणावा.

## भ्रमणाडळ मुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंसप्तभिर्भागमाहरेत् ॥ त्रिषट्क भ्रमणंचैवाद्विसप्तमहदाडलं ॥ ८१ ॥ प्रथमंपंच चत्वारिआडळोनास्तिनिश्चितं ॥ आडळेताडनं प्रोक्तंभ्रमणेकार्यनाशनं ॥ ८२ ॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों गणून ७ नीं भागून शेष ३ अथवा ६ उरले तर त्या दिवशीं भ्रमण आहे कार्य नाश. २-किंवा ७ उ-

रले तर आडळ आहे तें गमनास वर्ज्य; ताडन करण्यास उक्त. १,५,४ उ-रेल तर आडळ नाहीं, गमनास उक्त.

## हैवर मुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंपक्षादितिथिवारयुक् ॥ नवभि स्तुहरेद्भागंसप्तशेषंतुहैवरं ॥ ८३ ॥

अर्थः-सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों गणून त्यांत पक्ष, तिथि, वार मिळवून ९नीं भागून शेष ७ उरले तर हैवर मुहूर्त आहे तांगमनास शुभ होय.

## घबाड मुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंत्रिगुणंतिथिमिश्रितं ॥ सप्त-भिस्तुहरेद्भागंत्रीणिशेषंघबाडकं ॥ ८४ ॥

अर्थः-सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों गणून ती संख्या त्रि-गुणित करून चालती तिथी त्यांत मिळवून ७ नीं भागावी आणि ३ शेष उरले तर घबाड मुहूर्त जाणावा.

## वारपरत्वें स्वरशकुन.

गुरौशनौरवौभौमेशुभोवैदक्षिणःस्वरः ॥अन्यवारे-षुवामस्तुस्वरश्चैवशुभःस्मृतः ॥ ८५ ॥ निर्गमे वामतःश्रेष्ठःप्रवेशोदक्षिणःशुभः ॥ यः स्वरः से-वनासाग्रेयोगिनांमतमीदृशं ॥ ८६ ॥

अर्थ.-गुरु, शनि, रवि, भौम या चहूं वारी आपले नासिकेचा दक्षिण-स्वर वाहत असेल तर तो प्रवेश करण्यास श्रेष्ठ होय आणि चंद्र बुध शुक्र या वारीं वामस्वर वाहत असेल तर तो निर्गमास श्रेष्ठ असें योग्याचें मत आहे.

## वारपरत्वें पादच्छायायुक्त मुहूर्त.

अष्टौपादाबुधेस्युर्नवधरणिसुतेसप्तजीवेपदानिझे-याचैकादशार्केशनिशशिभृगुजेत्वर्धयुग्वेदपादाः ॥ तास्मिन्कालेमुहूर्तेसकलगुणयुतेकार्यसिद्धिःशुभो-

क्तानास्मिन्पंचांगशुद्धिर्नखलुशशिबलंभाषितंगर्ग-
मुख्यैः ॥ ८७ ॥

अर्थ.—८ पावलें आपली छाया झाली ह्मणजे बुधवारीं गमन करावें. ९ पावलें झाली म्हणजे मंगळवारी, ७ पावलें झालीं म्हणजे गुरुवारीं, ११ पावलें झालीं ह्मणजे रविवारीं आणि ४॥ पावलें झालीं म्हणजे शनि, सोम, शुक्र ह्या तिन्हीं वारीं गमन करावें. हा मुहूर्त सकल गुणयुक्त व सकल कार्यसिद्धि कर्ता होय. यास पंचांगशुद्धि व चंद्रबळ इत्यादिक पाहण्याची गरज नाहीं. असें गर्गादि मुनी सांगतात.

## काकशब्द शकुन.

काकस्यवचनंश्रुत्वापादछायांतुकारयेत् ॥ त्रयो-
दशयुतांकृत्वाषड्भिर्भागमाहरेत् ॥ ८८ ॥ ॥ फळ ॥
लाभःखेदस्तथासौख्यंभोजनंचधनागमः ॥ अ-
शुभंचक्रमेणैवगर्गस्यवचनंयथा ॥ ८९ ॥

अर्थ.—काकशब्द ऐकून आपली छाया पावेंकरून मोजून त्यांत १३ मिळवावे आणि त्या संख्येस ६ नीं भागावें. शेष राहील त्याचें फळः— १ उरेल तर लाभ, २ उरले तर खेद; ३ उरले तर सौख्य, ४ उरले तर भोजन प्राप्ति, ५ उरले तर धनलाभ आणि पूर्ण आल्यास अशुभ जाणावें. याप्रमाणें गर्गमुनीचें वचन आहे.

## पिंगला शब्दशकुन.

उल्हासःकिल्बिलेचैवचिल्पिल्याभोजनंतथा ॥ बं-
धनंखिटिखिट्टीस्यात्कर्कुरशब्दैर्महद्भयं ॥ ९० ॥

अर्थ.—किलबिल शब्द झाला तर उत्साह होय, चिल्पिल असा शब्द झाल्यास भोजन प्राप्ति व खिटिखिट्टी असा शब्द झाल्यास बंधन होय आणि कर्कुर असा शब्द झाला तर महाभय जाणावें.

## शिंकापरत्वें पादच्छाया शकुन.

बुधैश्छिक्कारवंश्रुत्वापादच्छायांतुकारयेत् ॥ त्रयो-
दशयुतांकृत्वाचाष्टभिर्भागमाहरेत् ॥ ९१ ॥ फळ॥

लाभःसिद्धिर्हानिशोकौभयंश्रीर्दुःखनिष्फले ॥ क्र-
मेणैवफलंज्ञेयंगर्गेणचयथोदितं ॥ ९१ ॥

अर्थ.—शिका शब्द ऐकून आपली छाया पावलांनीं मोजून त्यांत १३ अंक मिळवून ८ नीं भागावी. शेष राहील त्यांचें फळः—१ उरला तर लाभ २ उरले तर सिद्धि, ३ उरले तर हानि, ४ उरले तर शोक, ५ उरले तर भय ६ उरले तर लक्ष्मी, ७ उरले तर दुःख, आणि पूर्ण उरेल तर निष्फळ असें गर्गमुनी सांगतात.

## दिशापरत्वें शिंका शकुन.

छिकाप्रश्नंप्रवक्ष्यामिपूर्वस्यामशुभंफलं ॥ आग्ने-
य्यांशोकदुःखंस्यादरिष्टंदक्षिणेतथा ॥ ९२ ॥ नै-
र्ऋत्यांचशुभंप्रोक्तंपश्चिमेमिष्ठभक्षणं ॥ वायव्यां
धनलाभस्तुउत्तरेकलहस्तथा ॥ ९३॥ ईशान्यांच
शुभंज्ञेयमात्मछिक्कामहद्भयं ॥ ९४ ॥ आसनेश-
यनेचैवदानेचैवतुभोजने॥वामांगेपृष्ठतश्चैवषट्छि-
क्काश्चशुभावहाः ॥ ९५ ॥

अर्थ.—दिशापरत्वें शिंकेची फळें.—पूर्वेची शिंका अशुभ, आग्नेयेची शोक व दुःखकारक, दक्षिणेची अरिष्ट कारिणी. नैर्ऋत्येची शुभ, पश्चिमेची मिष्टान्न भक्षण, वायव्येची धनदायक, उत्तरेची कलह कारक, ईशान्येची शुभकारक आणि आत्म शिंकेचें मोठें भय, ऊर्ध्व झाली तर शुभ, मध्ये झाली तर मोठें भय, असनावर शयनावर दान देतां भोजन करतां वामभागी अथवा पृष्ठभागीं या ६ स्थानी शिंका शुभ होय.

## पल्लीशब्द शकुन.

वित्तंब्रम्हणिकार्यसिद्धिमतुलांशक्रेहुताशेभयंया-
म्योमित्रवधःक्षयश्चानिर्ऋतेलाभःसमुद्रालये॥वा-
यव्यांवरमिष्टमन्नमशनंसौम्येर्थलाभस्तथाईशा-
नेगृहगोधिकार्यमतुलंसर्वत्रभूमौभयं ॥ ९६ ॥

अर्थ.—पल्लीच्या शब्दाचें दिशापरत्वें फळ.—ऊर्ध्व दिशेस लक्ष्मी प्राप्ति

पूर्व दिशेस कार्य सिद्धि, आग्नेयेस भय, दक्षिणेस मित्रवध, नैर्ऋत्येस क्षय, पश्चिमेस लाभ, वायव्येस मिष्टान्न भोजन, उत्तरेस लाभ, ईशान्येस कार्यसिद्धि आणि भूमीवर शब्द जाहला असतां भय याप्रमाणें फळ जाणावीं.

## पल्लीपतन व सरटा रोहण.

राज्यंतुशिरसिज्ञेयंललाटेबंधुदर्शनं ॥ भ्रूमध्ये राजसन्मानऊर्ध्वोष्ठेचधनक्षयः ॥ ९७ ॥ अधरोष्ठेधनैश्वर्यंनासांतेव्याधिपीडनं ॥ आयुष्यंदक्षिणेकर्णेबहुलाभस्तुवामके ॥ ९८ ॥ अक्ष्णोस्तु बंधनंज्ञेयंभुजेभूपातितुल्यता ॥ राजक्षोभंतथा वामेकंठेशत्रुविनाशनं ॥ ९९ ॥ स्तनद्वयेचदौर्भाग्यमुदरेमंडनंशुभं ॥ प्रज्ञानाशःपृष्ठदेशेजानुजंघेशुभावहं ॥ १०० ॥ करद्वयेवस्त्रलाभःस्कंधयोर्विजयीभवेत् ॥ नाभौबहुधनंप्रोक्तमूर्वोश्चैवहयादिकं ॥ १०१ ॥ दक्षिणेमणिबंधेचमनस्तापंधनक्षयं ॥ मणिबंधेतथावामेकीर्तिवृद्धिधनप्रदं॥१०२ नखेषुधान्यलाभंचवक्त्रेमिष्टान्नभोजनं ॥ गुल्फयोर्बंधनंज्ञेयंकेशांतेमरणंध्रुवं ॥ १०३ ॥ अध्वानं दक्षिणेपादेवामेबंधुविनाशनं ॥ स्त्रीनाशःस्यात्पादमध्येपादांतेमरणंभवेत् ॥ १०४ ॥ पल्याःप्रपतनंज्ञेयंसरटस्याधिरोहणं ॥ यात्राद्युक्तंमनुष्यस्य शुभाशुभविसूचकं ॥ १०५ ॥ तिलमाषादिदानंचस्नात्वादेयंद्विजन्मने ॥ पिनाकिनंनमस्कृत्य जपेन्मंत्रंषडक्षरं ॥ १०६ ॥ शतंसहस्रमथवासर्वदोषनिबर्हणं ॥ शिवालयेप्रदद्याद्वैदीपंदोषोपशांतये ॥ १०७ ॥

अर्थ.—मनुष्य गमनास उद्युक्त असतां अंगावर पल्लीपतन अथवा सरटारोहण झालें तर शरीर स्थानपरत्वें शुभाशुभ सूचक अशी फलेंसांगतों.

| | | |
|---|---|---|
| १ शिरावर राज्यप्राप्ति. | १२ कंठावर शत्रुनाश. | २३ डावामनगट कीर्ति. |
| २ कपाळावर बंधुदर्शन. | १३ स्तनावर दौर्भाग्य. | २४ नखांवर धान्यलाभ. |
| ३ भिवया राजसन्मान. | १४ उदरावर शुभमंडन | २५ मुखावर मिष्टान्नभो. |
| ४ वरचा ओंठ धनक्षय. | १५ पृष्ठावर वुद्धिनाश. | २६ गुल्फावर बंधन. |
| ५ खालचा ओंठ धनऐश्व. | १६ ढोंपरांवर शुभ. | २७ केशांवर मरण. |
| ६ नाकावर व्याधि पीडा | १७ पोटऱ्यांवर शुभ. | २८ दक्षिणपाद मार्गेचाल |
| ७ उजवा कान आयुष्य | १८ दोन्ही हात वस्त्रलाभ | २९ वामपाद बंधुनाश. |
| ८ डावा कान बहुतलाभ | १९ खांद्यावर बहुधन. | ३० पायांचा मध्य स्त्रीनाश. |
| ९ नेत्रांवर बंधन. | २० नाभीवर बहुधन. | |
| १० बाहूंवर राजासम. | २१मांड्यांवर घोडावाहन | ३१ पादांत मरण. |
| ११ वामबाहूवर राजक्षो. | २२ उजवामनगट धनक्ष | |

याप्रमाणे पल्लीपतन व सरटारोहण फलें जाणावीं. आणि पाल अंगावर पडली किंवा सरटारोहण झाले असतां सचैल स्नान करून तीळ, उडीद इत्यादि दानें ब्राह्मणास द्यावी. आणि सांबास नमस्कार करून शिवपडक्षर मंत्राचा जप ११००० करावा व शिवालयांत दीप लावावा. म्हणजे दोष जातो.

## अंगस्फुरण.

मनुरुवाच ॥ ब्रूहिमेत्वंनिमित्तानिअशुभानिशुभानिच ॥ सर्वधर्मभृतांश्रेष्ठत्वंहिसर्वंविबुध्यसे ॥ १०८ ॥

अर्थ.—मत्स्यावतारी मनु प्रश्न करितो हे धर्मधारक श्रेष्ठा, तूं मला शुभाशुभ निमित्तें सांग कारण तूं सर्व जाणतोस.

अंगस्यदक्षिणेभागेप्रशस्तंस्फुरणंभवेत् ॥ अप्रशस्तंतथावामेपृष्ठस्यहृदयस्यच ॥ १०९ ॥

अर्थ.—अंगस्फुरण दक्षिणभागी शुभ. वाम भाग, पृष्ठभाग व हृदय हीं अशुभ स्थानें जाणावी.

अंगानांस्पंदनंचैवशुभाशुभविचेष्टितं ॥ तन्मेविस्तरतोब्रूहियेनस्यात्तद्विधंभुवि ॥ ११० ॥॥ म-

त्स्यउवाच ॥ ॥ पृथ्वीलाभोभवेन्मूर्ध्निललाटे रविनंदन ॥ स्थानंविवृद्धिमायातिभ्रूमध्येप्रियसंगमः ॥ ११ ॥ भृत्यलब्धिश्चाक्षिदेशेदृगुपांते धनागमः ॥ कंठस्यस्फुरणंमध्येदृष्टंराज्यंविचक्षणैः ॥ १२ ॥ दृग्बंधनेसंगरेचजयःशीघ्रमवाप्नुयात् ॥ योषिल्लाभोऽपांगदेशेश्रवणांतेप्रियश्रुतिः ॥ १३ ॥ नासिकायांप्रीतिसौख्यंप्रियाप्तिरधरोष्ठके ॥ कंठेतुभोगलाभःस्याद्रोगवृद्धिरथांसयोः ॥ १४ ॥ सुहृत्स्नेहश्चबाहुभ्यांहस्तेचैवधनागमः॥पृष्ठेपराजयोत्सेधोजयोवक्षस्थलेभवेत् ॥११५ कुक्षिभ्यांप्रीतिरुद्दिष्टास्त्रियःप्रजननेभगे ॥ स्थानभ्रंशोनाभिदेशेआंत्रेचैवधनागमः ॥११६॥ जानुसंधौपरैःसंधिर्बलवाद्भिर्भवेन्नृप ॥ एकदेशेभवेत्स्वामीजंघाभ्यांरविनंदन ॥ ११७ ॥ उत्तमस्थानमान्योहिपद्भ्यांप्रस्फुरणेनृप ॥ अलाभंचैवगमनंभवेत्पादतलेनृप ॥ ११८ ॥

अर्थः—मनु प्रश्न करितो कीं, अंगाचीं स्थानें स्फुरण पावलीं तर त्यांचीं शुभाशुभ फलें विस्तारें करून सांग. मत्स्य सांगतो,

१ मस्तक स्फुरण पृथ्वीलाभ.
२ ललाट स्थानाची वृद्धि.
३ भिवयांचे मध्य प्रियांची भेट.
४ नेत्रांजवळ चाकर मिळतील.
५ पापण्या स्फुरण धनप्राप्ति.
६ कंठमध्य राज्यप्राप्ति.
७ दृग्बंधन युद्धांत जय मिळेल.
८ अपांग देश स्त्रीलाभ.
९ कर्ण प्रीतीचीं भाषणें ऐकूं येतील.
१० नासिक प्रीति सौख्यप्राप्ति.
११ अधरोष्ठ प्रियकर वस्तु प्राप्ति.
१२ कंठ ऐश्वर्यप्राप्ति.
१३ खांदे वृद्धि प्राप्त होईल.
१४ दोन्हीं बाहु सुहृत्संबंधी यांची भे,
१५ दोन्हीं हात धनप्राप्ति.
१६ पृष्ठ दुसऱ्यापासून जय होईल.

१७ ऊरु जयप्राप्ति.
१८ कुक्षिस्फुरण प्रीति.
१९ शिश्न स्त्रीप्राप्ति.
२० नाभिस्फुरण स्थानभ्रंश.
२१ आंतडी धनप्राप्ति.
२२ ढोपरें, संधि, उपसंधि या तिहीं-चें फळ वळकटाशीं संधि.
२३ पोटऱ्या एक देशाची प्राप्ति.
२४ पाय उत्तम स्थानीं मान्यता होईल.
२५ तळवे पायांचे गमन होईल.

## स्त्रियांचें अंगस्फुरण.

लांछनंपीटकंचैवज्ञेयंस्फुरणवत्तथा ॥ विपर्ययेण विहितःसर्वस्त्रीणांविपर्ययः ॥ दक्षिणेपिप्रशस्तें-गंप्रशस्तंस्याद्विशेषतः ॥ ११९ ॥

अर्थ.—स्त्रियांचें अंगस्फुरण भिचयांचे मध्यें गोंधळें काढितात तें स्थान, तशीच हीं सर्व मागें स्फुरण स्थानें सांगितलीं परंतु तींच स्थानें स्त्रियांस विपरीत धरून सांगावीं ह्मणजे स्त्रियांचें वामांग शुभ असें जाणावें.

अनन्यथासिद्धिरजन्मनःस्यात्फलस्यशस्तस्यच निंदितस्य ॥ अनिष्टचिन्होपगमेद्विजानांकार्यं सुवर्णेनतुतर्पणंस्यात् ॥ १२० ॥

अर्थः—अंगस्फुरणाचें फल बरें किंवा वाईट असेल तेंअन्यथा होत नाहीं; अनिष्ट निमित्त झाल्यास सुवर्ण दान करणें.

## नेत्र स्फुरण.

नेत्रस्योर्ध्वेंहरतिसकलंमानसंदुःखजालंनेत्रोपांते दिशतिचधनंनासिकांतेचमृत्युः॥ नेत्रस्याधःस्फु-रणमसकृत्संगरेभंगहेतुर्वामेचैतत्फलमविफलंद-क्षिणेवैपरीत्यं ॥ १२१ ॥ स्त्रीणांविपर्ययो ॥

अर्थः—नेत्राचीं उर्ध्व प्रांतादिस्थानें स्फुरण होतात त्यांचीं फळें सांगतों.—नेत्राच्या वरील पापण्या स्फुरण झाल्यातर मनाचें दुःख जाईल आणि धन प्राप्ति होईल. नासिकाजवळची बाजू स्फुरण झाली तर मृत्यु. अधर प्रांत स्फुरण झाला तर युद्धांत अपजय. - हीं सर्व फळें दक्षिण नेत्राची घ्यावी.

वाम नेत्राचीं विफळ आणि स्त्रियांचीं वाम नेत्राची घ्यावीं. दक्षिण नेत्राचीं विफळ होत.

## त्रिशूलयंत्र.

रोगिणश्चकुजाद्यर्क्षंदिनाद्यर्क्षंचयुद्धतः ॥ कृत्तिकागमनेदद्यादन्यत्ररविदीयते ॥ १२२ ॥

अर्थ.—रोग्याचे प्रश्नास त्रिशूल मध्याग्रीं मंगळ ज्या नक्षत्रीं असेल तें घावें आणि चंद्र ज्या स्थानीं यंत्रांस येईल तें फळ घ्यावें याप्रमाणें पुढील क्रम जाणावा. युद्धांत जाणें तर दिन नक्षत्रापासून सूर्य नक्षत्रापावेतों आणि अन्य कर्मास सूर्य नक्षत्रापासून दिन नक्षत्रापावेतों असा क्रम जाणावा.

त्रिशूलाग्रेभवेन्मृत्युर्मध्यमंबहिरष्टकं ॥ लाभक्षेमंजयारोग्यंचंद्रगर्भेषुसंमतं ॥ १२३ ॥

अर्थ.—त्रिशूल अग्रभागीं दिन नक्षत्र आलें तर मृत्यु. बाहेरील अष्टकांत आले तर मध्यम आणि मध्य अष्टकांत आलें तर लाभ, क्षेम, जय व आरोग्य हें सर्व संमत जाणावें.

## गमनास लग्नें.

चरलग्नेंप्रयातव्यंद्विस्वभावेतथानरैः ॥ लग्नेस्थि
रेनगंतव्यंयात्रायांक्षेममीप्सुभिः ॥ १२४ ॥

अर्थ.—चर ह्मणजे मेष, कर्क, तूळ, मकर ही चार लग्नें व द्विस्वभाव ह्मणजे मिथुन, कन्या, धन, मीन, ही चार अशी आठ लग्नें गमनास उक्त होत. कार्य सफळ होय. आणि शेष राहिली ती लग्नें वर्जावी.

## दुसरा लग्नाचा प्रकार.

लग्नेकार्मुकमेषतौलिगमनेकार्येविलंबोनृणांपंचत्वं
मकरेतथैवचघटेतद्वत्फलंवृश्चिके ॥ सिंहेकर्कट-
केवृषेपरिगतःसर्वार्थसिद्धिंलभेत्कन्यामीनगत-
स्तथैवमिथुनेसौख्यंशुभान्नंवसु ॥ १२५ ॥

अर्थ.—धन, मेष, तूळ या तिन्हीं लग्नीं गमन केलें तर विलंबें करून कार्य होईल. मकर कुंभ, वृश्चिक ही लग्नें मृत्युकारक; सिंह, कर्क, वृषभ ही लग्नें कार्यसिद्धि करणारी होत आणि कन्या, मीन. मिथुन ही तिन्ही लग्नें सौख्यकारक, शुभ आणि धन व धान्य देणारी होत.

## गमनलग्नीं द्वादशस्थानपरत्वें ग्रहबल पाहणें.

### प्रथमस्थान.

लग्नस्थंचाष्टमंत्याज्यंपापंद्वादशमेवच ॥ ग्रहा-
णांचबलंवीक्ष्यगच्छेद्दिग्विजयंनृपः ॥ १२६ ॥

अर्थ.–लग्नीं, अष्टमस्थानी आणि द्वादशस्थानीं. पापग्रह वर्ज्य करून ग्रहबल घेऊन गमन करावें दिग्विजयकार्य सिद्धि होय.

लग्नेयदास्युर्गुरुसौम्यशुक्राःसिद्ध्यंतिकार्याणिच
पंचमेन्हि ॥ राज्यास्पदंवासुखदेशलाभंमासस्य
मध्येगृहभावयुक्तं ॥ १२७ ॥

अर्थ.—लग्नीं गुरु अथवा बुध, शुक्र असले तर ५ दिवसांत अथवा एक मासांत राज्यपद, सुख किंवा देशलाभ प्राप्त जाणावा.

## द्वितीय स्थानाचें फळ.

जीबोबुधोवाभृगुनंदनोवास्थानेद्वितीयेगमनस्यका- ले ॥ सुवस्त्रलाभंचतुरंगलाभंमासस्यमध्येचच- तुर्दशेन्हि ॥१२८॥

अर्थ.—द्वितीय स्थानीं गुरु, बुध अथवा शुक्र असे असले तर वस्त्र, आणि तुरंग लाभ एके मासामध्यें १४ वे दिवशीं प्राप्त होतील.

क्रूराधनस्थारविराहुभौमाःसौरिश्चकेतुस्त्रिभिरेव मासैः ॥ वित्तस्यनाशंचददातिमृत्युंसत्यंहिवा- क्यंमुनयोवदंति ॥ १२९ ॥

अर्थ.—द्वितीय स्थानीं रवि, राहु, मंगळ शनि आणि केतु या क्रूर ग्रहांतून कोणताही ग्रह असला तर ३ मासांत मृत्युकारक आणि वित्तनाशक होतो. हें सत्य वाक्य मुनि बोलतात.

## तृतीय स्थानाचें फल.

स्थानेतृतीयेगुरुभार्गवौचसोमस्यसूनुश्चनिशाप- तिश्च ॥ करोतिकार्यंसफलंचकार्यंपक्षद्वयेनापि दिनत्रयेण ॥ १३०

अर्थ.—तृतीय स्थानीं गुरु, शुक्र, चंद्र अथवा बुध असेल तर १ मासांत अथवा ३ दिवसांत कार्य सफळ होईल.

## चतुर्थ स्थानाचें फळ.

क्रूराश्चतुर्थेगमनेचकुर्युर्नाशंचशेषाःशुभदंचकार्यं ॥ तत्रापिदैवेनभवेच्चसिद्धिर्मासत्रयेणापिदशाहम- ध्ये ॥ १३१ ॥

अर्थ.—क्रूर ग्रह वर सांगितले आहेत त्यांतून कोणताही ग्रह चतुर्थ स्थानीं वर्ज करून शेष ग्रह राहिले ते असतां शुभ परंतु दैवयोगें करून ३ मास, १० दिवसांत कार्यसिद्धि होईल किंवा नाहीं होणार.

## पंचमस्थानाचें फळ.

भृगुर्गुरुश्चंद्रबुधौयदास्युःशुभेचलग्नेतुसुतेचयु-
क्ताः ॥ कुर्वंतिकार्यस्यचासिद्धिमिष्टांमासद्वयेना-
पिवदंतिसत्यं ॥ १३२ ॥

अर्थ.–गुरु, शुक्र, चंद्र अथवा बुध या चार ग्रहांतून पंचमस्थानीं ग्रह असतां शुभ होय. २ मासानी इष्ट कार्य सिद्धि होय.

## षष्ठ स्थानाचें फळ.

जीवश्चशुक्रश्चबुधश्चषष्ठेकरोतियात्रासुफलंविलग्ना-
त् ॥ पक्षद्वयेनापिवदंतिसत्यंसौम्यर्क्षसंस्थःसब-
लश्चचंद्रः ॥ १३३ ॥

अर्थ.–गुरु, शुक्र,अथवा बुध यांतून ग्रह षष्ठस्थानीं असला तर याला सफळ आणि मृग नक्षत्रींचा चंद्र त्यास्थानीं असतां सबळ एक मासानें कार्य सिद्धि जाणावी.

## सप्तम स्थानाचें फळ.

चेत्सप्तमस्थागुरुसोमसौम्याःकुर्वंतियात्राविज-
योनृपाणां ॥ सर्वेनृपास्तस्यभवंतिवश्यामास-
द्वयेनापिचपंचभिर्दिनैः ॥ १३४ ॥

अर्थ.–सप्तमस्थानीं गुरु, सोम अथवा बुध हे असतां विजय. होय २ मास, ५ दिवसांत सर्व राजे वश होतील.

## अष्टम स्थानाचें फळ.

क्रूराश्चसर्वेयदिलग्नकालेमृत्युस्थितामृत्युकराव-
दंति ॥ सौम्योगुरुर्वाभृगुनंदनश्चदीर्घायुषंमृत्यु-
करश्चचंद्रः ॥ १३५ ॥

अर्थ.–क्रूर ह्मणजे शनि, रवि, भौम, राहु, केतु यांतून ग्रह अष्टमस्थानीं असतां मृत्यु कारक आणि हे नसतां सौम्य ग्रह असले तर आयुष्याची वृद्धि करणारे होत परंतु चंद्र नसावा तो मृत्यु कारक होय.

## नवमस्थानाचें फळ.

धर्मस्थितायदिभवंतिहिपापखेटाःप्रयाणकालेच तथैवचंद्रमाः ॥ तदाजयोवैसबलेचचंद्रेमासत्रयेणापिदिनैश्चतुर्भिः ॥ १३६ ॥

अर्थ.—नवमस्थानीं पापग्रह असतां उक्त परंतु चंद्रबळ असावें म्हणजे ३ मास ४ दिवसांत कार्य सिद्धि होईल.

धर्मस्थितौवायदिजीवशुक्रौसोमस्यसूनुर्यदिलग्नकाले ॥ लग्नेचरेवायदिवास्थिरेवाकार्यस्यसिद्धिश्चभवेच्चलाभः ॥ १३७ ॥

अर्थ.—नवमस्थानीं गुरु, शुक्र अथवा सोम, बुध हे चर लग्न स्थित किंवा स्थिर लग्नीं असतां कार्य सिद्धि होईल.

## दशम स्थानाचें फळ.

कर्मस्थिताःपापखगास्तुसौम्याःकुर्वंतिकार्यंशनिवर्जिताश्च ॥ लग्नेचरेवायदिवास्थिरेवामासत्रयेणापिचचैकमासः ॥ १३८ ॥

अर्थ.—दशमस्थानीं शनि वर्ज करून पापग्रह व सौम्यग्रह असतां चर अथवा स्थिर लग्नीं उक्त. ३ किंवा १ मासानीं कार्य सिद्धि होईल.

## एकादश स्थानाचें फळ.

लाभस्थितौगुरुबुधौभृगुनंदनोवाक्रूराश्चसर्वेशशिनैवयुक्ताः ॥ सद्यःफलाप्तिश्चभवेद्धियात्रापक्षैकामध्येदिवसत्रयेच ॥ १३९ ॥

अर्थ.—एकादशस्थानीं रवि आदि करून पापग्रह चंद्रासहित अथवा गुरु आदि करून सौम्य ग्रह असतां १ पक्षामध्यें ३ दिवसांत कार्य सिद्धि होईल.

## द्वादश स्थानाचें फळ.

सर्वेशुभाद्वादशसंस्थिताश्चेद्यात्राभवेत्तत्रविचि-

त्वलाभः ॥ पापाश्चसर्वेव्ययदाभवंतियात्राफलं गर्गमुखैःप्रणीतं ॥ १४० ॥

अर्थः—द्वादशस्थानीं शुभ ग्रह असतां यात्रा सांग होऊन तीत विचित्र लाभ होय आणि पापग्रहत्यास्थानी असतां यात्रा व्ययप्रद होईल असें गर्गमुनि सांगतात.

## प्रस्थान ठेवणें.

सुमुहूर्तेस्वयंगमनासंभवेप्रस्थानंकार्यं ॥ यज्ञोपवीतकंशस्त्रंमधुचस्थापयेत्फलं ॥ विप्रादिक्रमतः सर्वैःस्वर्णधान्यांबरादिकं ॥ १४१ ॥

अर्थः—सुमुहूर्तावर गमन करण्याचा असंभव आहे तर प्रस्थानीं वस्तु ठेवणें त्या वर्ण परत्वें सांगतों-ब्राम्हणानें यज्ञोपवीत, क्षत्रियानें शस्त्र, वैश्यानें मधु आणि शूद्रानें फळ या क्रमानें जाणावें आणि सर्व वर्णांस सुवर्ण, धान्य वस्त्र हीं उक्त होत.

## प्रस्थान किती दिवस उपयोगीं पडतें तें.

राजादशाहंपंचाहमन्योन्यःप्रस्थितोवसेत् ॥ अंगप्रस्थानसंपूर्णवस्तुप्रस्थनकेऽर्धकं ॥ १४२ ॥

अर्थ.—राजास प्रस्थान ठेवल्या पासून १० दिवस आणि अन्यास ५ दिवस तो मुहूर्त उपयोगीं पडतो परंतु वस्तु प्रस्थानीं अर्धफळ जाणावें आणि अंग प्रस्थानीं संपूर्ण फळ होय.

## प्रस्थान किती दूर ठेवावें त्याचें प्रमाण.

गेहाद्गेहांतरंगर्गःसीम्नःसीमांतरंभृगुः ॥ बाणक्षेपंभरद्वाजोवसिष्ठोनगराद्बहिः ॥ प्रस्थानेपिकृते नेयान्महादोषान्वितेदिने ॥ १४३ ॥

अर्थ.—गर्गाचे मतें दुसऱ्याचे घरी, भृगूचे मतें सीमेचे अंतीं, भरद्वाजाचे मतें नगराबाहेर, वसिष्ठाचे मतें बाण सोडल्यावर तो ज्या ठिकाणी जाऊन पडतो तितकें लांब प्रस्थान ठेवावें. या प्रमाणें शुभ दिनीं शुभ वेळेस प्रस्थान ठेवलें तरीं गृहांतून निघणें महा दोष युक्त दिवशीं करूं नये.

## प्रयाण दिवशीं वर्ज्य पदार्थ.

क्रोधक्षौररतिश्रमामिषगुडद्यूताश्रुदुग्धासवक्षा-

राभ्यंगभयासितांबरवमीस्तैलंकटूक्ष्णेंद्रमे ॥ क्षीर क्षौररतीःक्रमात्रिशरःसप्ताहंपरंतद्दिनेरोगस्यार्त- वकंसितान्यातिलकंप्रस्थानकेऽपीतिच ॥ १४४ ॥

अर्थ.—क्रोध, क्षौर, स्त्रीसंग, आयास, मांस, गूळ, द्यूत, रुदन, दुग्ध मद्य, क्षार, अभ्यंग, अन्यविषयक भीति, शुभ्र वर्णावांचून अन्य वर्णाचें वस्त्र वमन, तैल, तिखट, इतके प्रयाण दिवशी वर्ज्य करावे. आणि त्यांतून दुग्ध, क्षौर, स्त्रीसंग हे क्रमानें ३, ५, ७ दिवस प्रयाण दिवसापासून पूर्वी वर्ज्य करावे आणि त्या दिवशीं शरीरीं रोगोद्भव स्त्रीरजस्वला आणि शुभ्रातिरिक्त तिलक हेही वर्जावे व याच प्रकारें सुमुहुर्तीं प्रस्थान ठेवलेल्या दिवशींही वर्ज्य करावे.

## मात्स्योक्त दुष्ट शकुन.

औषधेनतुयुक्तानिधान्यंकृष्णंतुयद्भवेत् ॥ कार्पास- श्चतृणंशुष्कंशुष्कंगोमयमेवच ॥ १४५ ॥

अर्थ.—औषधयुक्त मनुष्य, काळें धान्य, कापूस, वाळलेलें गवत, गोंवऱ्या हे दुष्ट शकुन होत.

इंधनंचतथाभस्मगुडसर्पिस्तथाऽशुभं ॥ अभ्य- क्तोमलिनोमंदस्तथानग्नश्चमानवः ॥ १४६ ॥

अर्थ.—काष्ठें, भस्म, गूळ, तूप, दुष्ट पदार्थ, अभ्यंग केलेला मनुष्य, मलिन, मद, नग्न मनुष्य हे वाईट.

मुक्तकेशोरुजार्तश्चकाषायांबरधारिच ॥ उन्मत्तः कंथितोऽसत्वोदीनोवाथनपुंसकः ॥ १४७ ॥

अर्थ.—मोकळे केशांचा मनुष्य, रोगी, भगवीं वस्त्रें धारण केलेला, उन्मत्त, कंथायुक्त, पापपुरुष, दीन व नपुंसक हे सर्वकाळ वाईट.

अयःपंकस्तथाचर्मकेशबंधनमेवच ॥ तक्रंवोद्धृत सारंचपिण्याकादितथानच ॥ १४८ ॥

अर्थ.—लोखंड, चिखल, चर्म, केशबंधन, ताक, पेंड हे दुष्ट शकुन जाणावें,

चांडालःशवयुक्तश्चराजबंधनपालकाः ॥ वधकाः पापकर्माणोगर्भिणीस्त्रीतथैवच ॥ १४९ ॥

अर्थ.—चांडाल प्रेतयुक्त, बंदिवान्, वधकर्ते, पापपुरुष, गर्भिणी स्त्री हे शकुन वाईट.

तुषंभस्मकपालास्थिभिन्नभांडानियानिच ॥ रक्तानिचैवभांडानिमृतसारंगएवच ॥ एवमादीनिचान्यानिअप्रशस्तानिदर्शने ॥ १५० ॥

अर्थ.—तूस, भस्म, कपालास्थि, फुटकीं भांडीं आणि तांब्याचीं भांडीं मृतसारंग पक्षी हे गमनकाळी दुष्ट शकुन झाले तर गमन वर्जावें.

क्वयासितिष्ठआगच्छकिंतेतत्रगतस्यतु ॥ अन्यशब्दाश्चयेनिष्टास्तेविपत्तिकराअपि ॥ १५१ ॥

अर्थ.—कोठें जातोस, उभा रहा, इकडे ये, त्या ठिकाणी तुझें काय काम आहे असे शब्द आणि अन्य अनिष्ठ शब्द कोणी बोलल्यास विपत्तिकारक होईल.

ध्वजादौवायसास्थानंअग्निदानंविगर्हितं ॥ स्खलनंवाहनानांचवस्त्रसंगस्तथैवच ॥ १५२ ॥

अर्थ.—ध्वजपताकांवर काक बसलेला आणि अग्निदान, वाहन पतन व वस्त्र नेसत असलेला पुरुष अशुभ.

दृष्टेनिमित्तेप्रथमेअमंगल्यंविनाशनं ॥ केशवंपूजयेद्विद्वान्स्तवेतमधुसूदनं ॥ १५३ ॥

अर्थ.—गमन समयीं वर सांगितली त्यांतून प्रथम अमंगळ दृष्टीस आलें तर नाश कारक होय. यांचे निवारणार्थ विष्णूची पूजा आणि मधुसूदनाचा स्तव करावा.

द्वितीयेचलतोदृष्टेप्रतीपेप्रविशेत्गृहं ॥ अथेष्टानिप्रवक्ष्यामिमंगलानितथानघ ॥ १५४ ॥

अर्थ.—दुसऱ्या वेळेस कुशकुन दृष्टीस पडले तर घरांत यावें त्या वेळीं यात्रेस जाऊं नये. आतां शुभ शकुन सांगतों.

## गमनकाळीं उत्तम शकुन.

प्रशस्तोवाद्यशब्दश्चभिन्नभेरीरवास्तथा ॥ पुरतः

शब्दएहीतिशस्यतेनतुपृष्ठतः ॥ गच्छेतिचैवंप-
श्चाद्यःपुरस्तात्भुविगर्हितः ॥ १५५ ॥

अर्थ.—गमन काळीं प्रशस्त शकुन वाद्यांचे शब्द, निरनिराळे नगाऱ्याचे शब्द शुभ व आपल्यापुढें कोणी मनुष्यानें ये असा शब्द म्हटल्यास शुभ, पाठीमागें वाईट व जा असा शब्द पाठीमागें शुभ, पुढें वाईट.

श्वेताःसुमनसःश्रेष्ठाःपूर्णकुंभस्तथैवच ॥ जलजाः
पक्षिणश्चैवमत्स्यपाशाश्चपार्थिव ॥ १५६ ॥

अर्थ.—पांढरीं पुष्पें, पूर्णकुंभ, जिवंत मासे, पक्षी, मत्स्याचे पाश असे शुभ होत.

गावस्तुरंगमोनागोवृक्षएकःपशुस्त्वजा ॥ त्रिद-
शाःसुहृदोविप्राःज्वलितश्चहुताशनः ॥ १५७ ॥

अर्थ.—गाय, घोडा, हत्ती, वृष, एक पशु, शेळी, देव, मित्र ब्राम्हण ज्वलित अग्नि.

गणिकाचमहाभागदूर्वाश्चर्द्राश्चगोमयं ॥ रुक्मं
रूप्यंचताम्रंचसर्वरत्नानिचाप्यथ ॥ १५८ ॥

अर्थ.—कळावंतीण, ओल्यादूर्वा, शेण, सोनें, रुपें, तांबें आणि सर्व रत्नें,

औषधानिचसर्वज्ञोयवाःसर्वार्थकास्तथा ॥ खड्ग-
पात्रंपताकाचमृदमायुधपीठकं ॥ १५९ ॥

अर्थ.—औषधी, सूज्ञपुरुष, यव, पांढऱ्या, मोहोऱ्या, खड्गपात्र, पताका, मृत्तिका, आयुध, आसन.

राजलिंगानिसर्वाणिशवंरुदितवर्जितं ॥ घृतंद-
धिपयश्चैवफलानिविविधानिच ॥ १६०

अर्थ.—राजचिन्हें, रुदनवर्जित शव, तूप, दहीं, दूध, नानाप्रकारचीं फळें,

स्वस्तिवर्धयमानंचनंद्यावर्तंसकौस्तुभं ॥ वादि-
त्राणांशुभःशब्दोगंभीरःसुमनोहरः ॥ १६१ ॥

अर्थ.–आशीर्वाद शब्द आणि शंख, कौस्तुभमणि, उत्तम वाद्यें, चांगले मनरंजन करणारे शब्द विघ्ननाशक.

गांधारषड्जऋषभयेगीताःसुस्वराःस्वराः ॥ वायुर्निःशर्करोऽत्युष्णःसर्वविघ्नविनाशकृत् ॥ १६२ ॥

अर्थ.–गांधार, षड्ज, ऋषभ, हे स्वर, सुस्वर गात असतां व वायु चांगला मधुर अथवा ऊष्ण सर्व विघ्ननाशक होय.

प्रतिलोमस्तथानीचोविज्ञेयोभयकृद्विजः ॥ अनुकूलोमृदुःस्निग्धःसुखस्पर्शःसुखावहः ॥ १६३ ॥

अर्थ.–संकर जातीचा पुरुष, तसाच नीच मुसलमानादि, मोठा भयंकर ब्राह्मण, आपणास अनुकूल पदार्थ, चांगलें आणि, सुखस्पर्शित मनुष्यादिक हे सुखावह होत.

शस्तान्येतानिधर्मज्ञयत्रस्यान्मनसःप्रियं ॥ मनसस्तुष्टिरेवात्रपरमंजयलक्षणं ॥ १६४ ॥

अर्थ.—हे शकुन सांगितले ते प्रशस्त. हे धर्मज्ञा. यांत आपले मनास प्रिय असेल त्याचें दर्शन फार उत्तम तुष्टिकारक व जय देणारें होय.

मनोत्सुकत्वंमनसःप्रहर्षःशुभस्यलाभोविजयप्रवादः ॥ मांगल्यलब्धिश्रवणंचराज्ञोज्ञेयानिनित्यंविजयावहानि ॥ १६५ ॥

अर्थ.–गमन काळीं मनास उत्कंठा व हर्ष, शुभ लाभ, विजय कारक वाक्यें व मांगल्य प्राप्ति कारक वाक्यांचें श्रवण अशा शुभसूचक शकुनावर गमन केलें असतां राजास नित्य विजयावह होय.

क्षेमंकरानीलकंठाश्वोलूकखरजंबुकाः ॥ प्रस्थाने वामतः श्रेष्ठाःप्रवेशेदक्षिणाःशुभाः ॥ १६६ ॥

अर्थ.–मयूर, अश्व, उलूकपक्षी, गाढव, कोल्हा हे प्रस्थान समयीं वामभागी घेऊन गमन करावे आणि प्रवेशास दक्षिण भागी घ्यावे शुभ होय.

इति यात्राप्रकरणं समाप्तम्.

अथआनंदादि शुभाशुभ योग.

सूर्येऽश्विभातुहिनरोचिषिचंद्रधिष्ण्यात्सार्पाच्च भूमितनयेचबुधेचहस्तात् ॥ मैत्रात्गुरौभृगुसुतेख-लुवैश्वदेवाच्छायासुतेवरुणभात्क्रमशःस्युरेव ॥ १ ॥ आनंदःकालदंडश्चधूम्राख्योथप्रजापतिः ॥ सौ-म्योध्वांक्षोध्वजोनामाश्रीवत्सोवज्रमुद्गरः ॥ २ ॥ छत्रोमैत्रोमानसश्चपद्माख्योलंबकस्तथा ॥ उत्पा-तोमृत्युकारणाख्यःसिद्धिश्चैवशुभोमृतः ॥ ३ ॥ मुसलोऽथगदाख्यश्चमातंगोराक्षसश्चरः ॥ स्थि-रःप्रवर्धमानश्चयोगोष्टाविंशतिःक्रमात् ॥ ४ ॥ ॥ फळ ॥ आनंदेलभतेसिद्धिंकालदंडेमृतिंतथा ॥ धूम्राख्येनसुखंप्रोक्तंसौभाग्यंचप्रजापतौ ॥ ५ ॥ सौम्येचैवमहत्सौख्यंध्वांक्षेचैवधनक्षयः ध्वजना-म्निचसौभाग्यंश्रीवत्सेसौख्यसंपदः ॥ ६ ॥ वज्रे क्षयोमुद्गरेचश्रीनाशस्तुतथैवच ॥ छत्रेचराजस-न्मानोमैत्रेपुष्टिर्नसंशयः ॥ ७ ॥ मानसेचैवसौभा-ग्यंपद्माख्येचधनागमः ॥ लंबकेधनहानिश्चउत्पा तेप्राणनाशनं ॥ ८ ॥ मृत्युयोगेभवेन्मृत्युःकाणेच क्लेशमादिशेत् ॥ सिद्धियोगेभवेत्सिद्धिःशुभेकल्या-णमेवच ॥ ९ ॥ अमृतेराजसन्मानंमुसलेचधनक्षयः ॥ गदाख्येचक्षयोविद्यान्मातंगेकुलवर्धनं ॥ १० ॥ राक्षसेतुमहत्कष्टंचरेकार्यंनासिध्यति ॥ स्थिरयोगे गृहारंभोप्रवृद्धेपाणिपीडनम् ॥ ११ ॥

| | योगांचीं नांवें. | रवि. | चंद्र. | मंगळ | बुध. | गुरु. | शुक्र | शनि. | फळें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | आनद. | अ. | मृ. | आ. | ह. | अ. | उ. | श. | सिद्धि. |
| २ | कालदंड. | भ. | आ. | म. | चि. | ज्ये. | अ. | पू. | मृत्यु. |
| ३ | धूम्र. | कृ. | पु. | पू. | स्वा. | मू. | श्र. | उ. | असुख. |
| ४ | प्रजापति. | रो. | पू. | उ. | वि. | पू. | ध. | रे. | सौभाग्य. |
| ५ | सौम्य. | मृ. | आ. | ह. | अ. | उ. | श. | अ. | मोठें सौख्य. |
| ६ | ध्वांक्ष. | आ. | म. | चि. | ज्ये. | अ. | पू. | भ. | धनक्षय. |
| ७ | ध्वज. | पु. | पू. | स्वा. | मू. | श्र. | उ. | कृ. | सौभाग्य. |
| ८ | श्रीवत्स. | पु. | उ. | वि. | पू. | ध. | रे. | रो. | सौख्य. |
| ९ | वज्र. | आ. | ह. | अ. | उ. | श. | अ. | मृ. | क्षय. |
| १० | मुद्गर. | म. | चि. | ज्ये. | अ. | पू. | भ. | आ. | लक्ष्मीनाश. |
| ११ | छत्र. | पू. | स्वा. | मू. | श्र. | उ. | कृ. | पु. | राजसन्मान. |
| १२ | मैत्र. | उ. | वि. | पू. | ध. | रे. | रो. | पु. | पुष्टि. |
| १३ | मानस. | ह. | अ. | उ. | श. | अ. | मृ. | आ. | सौभाग्य. |
| १४ | पद्माख्य. | चि. | ज्ये. | अ. | पू. | भ. | आ. | म. | धनप्राप्ति. |
| १५ | लुंबक. | स्वा. | मू. | श्र. | उ. | कृ. | पु. | पू. | धनहानि. |
| १६ | उत्पात. | वि. | पू. | ध. | रे. | रो. | पु. | उ. | प्राणनाश. |
| १७ | मृत्यु. | अ. | उ. | श. | अ. | मृ. | आ. | ह. | मृत्यु. |
| १८ | काणाख्य. | ज्ये. | अ. | पू. | भ. | आ. | म. | चि. | क्लेश. |
| १९ | सिद्धि. | मू. | श्र. | उ. | कृ. | पु. | पू. | स्वा. | कार्यसिद्धि. |
| २० | शुभ. | पू. | ध. | रे. | रो. | पु. | उ. | वि. | कल्याण. |
| २१ | अमृत. | उ. | श. | अ. | मृ. | आ. | ह. | अ. | राजसन्मान. |
| २२ | मुसल. | अ. | पू. | भ. | आ. | म. | चि. | ज्ये. | धनक्षय. |
| २३ | गदा. | श्र. | उ. | कृ. | पु. | पू. | स्वा. | मू. | क्षय. |
| २४ | मातग. | ध. | रे. | रो. | पु. | उ. | वि. | पू. | कुलवृद्धि. |
| २५ | राक्षस. | श. | अ. | मृ. | आ. | ह. | अ. | उ. | महाकष्ट. |
| २६ | चर. | पू. | भ. | आ. | म. | चि. | ज्ये. | अ. | कार्यनाश. |
| २७ | स्थिर. | उ. | कृ. | पु. | पू. | स्वा. | मू. | श्र. | गृहारभ. |
| २८ | वर्धमान. | रे. | रो. | पु. | उ. | वि. | पू. | ध. | लग्न. |

अर्थ.—आनंदादिक योग २८ त्यांत एकेक योगास ७ वार व ७ नक्षत्रें त्यांचा क्रम. रविवारीं अश्विनी, सोमवारीं मृग, मंगळवारीं आश्लेषा, बुधवारीं हस्त, गुरुवारीं अनुराधा, शुक्रवारीं उत्तराषाढा. आणि शनवारीं शततारका अशीं ह्या वारी हीं नक्षत्रें अनुक्रमें आलीं म्हणजे आनंदादि योग अनुक्रमानें होतात अशा २८ योगांचा क्रम. कोष्टकांत लिहिला आहे.

## चरयोग.

रवौपूषागुरौपुष्यःशनौमूलंभृगौमघा ॥ सौम्ये ब्राम्हंविशाभौमेचंद्राऽर्द्राचरयोगकः ॥ १ ॥ क्रकचयोगः ॥ रवौतुद्वादशीप्रोक्ताभौमेचदशमी तथा ॥ चंद्रेचैकादशीप्रोक्तानवमीबुधवासरे ॥ २ ॥ शुक्रेचसप्तमीज्ञेयाशनौचैवतुषष्ठिका ॥ गुरौचाष्टमिकाज्ञेयायोगस्तुक्रकचोबुधैः ॥ ३ ॥ दग्धयोग ॥ बुधेतृतीयाकुजपंचमीचषष्ठ्यांगुरौचाष्टमीशुक्रवारे ॥ एकादशीसोमशनिर्नवम्यां द्वादश्यमर्केइतिदग्धयोगः ॥ ४ ॥ मृत्युदा ॥ रवौभौमेभवेन्नंदाभद्राजीवशशांकयोः ॥ जया शुक्रेबुधेरिक्ताशनौपूर्णाचमृत्युदा ॥ ५ ॥ सिद्धियोग ॥ शुक्रेनंदाबुधेभद्राजयाभौमेप्रकीर्तिता ॥ शनौरिक्तागुरौपूर्णासिद्धियोगाउदाहृताः ॥ ६ ॥ उत्पातादियोग ॥ विशाखादिचतुष्कंतुभास्क-

रादिक्रमेणतु ॥ उत्पातमृत्युकालाख्यासिद्धियो- गाःप्रकीर्तिताः ॥ ६ ॥ यमदंष्ट्रयोग ॥ मघा धनिष्ठासूर्येतुचंद्रेमूलविशाखके ॥ कृतिकाभर- णीभौमेसौम्येपूषापुनर्वसू ॥ ८ ॥ गुरौउषाश्वि- नीशुक्रेरोहिणीचानुराधिका ॥ शनौविष्णुःशत- भिषग्यमदंष्ट्राःप्रकीर्तिताः ॥९॥ यमघंटयोग ॥ रवौमघाबुधेमूलंगुरौचैवचकृत्तिका ॥ भौमेचा- र्द्राशनौहस्तःशुक्रेचैवतुरोहिणी ॥ चंद्रेविशाखा योगोयंयमघंटःप्रकीर्तितः ॥ १० ॥ मुसलवज्र- योग ॥ चंद्रेचित्राभृगौज्येष्ठाशनौचैवतुरेवती ॥ चंद्रेजेतुधनिष्ठोक्तारवौतुभरणीतथा ॥ ११ ॥ उषाचैवतुभौमेचगुरौचैवोत्तरातथा ॥ अयंमुस- लवज्राख्योयोगोवर्ज्योऽशुभोबुधैः ॥ १२ ॥ अ- मृतसिद्धियोग ॥ आदित्यहस्तेगुरुपुष्ययोगेबु- धानुराधाशनिरोहिणीच ॥ सोमेचसौम्यंभृगुरे- वतीचभौमाश्विनीचामृतसिद्धियोगः ॥ १३ ॥

अर्थ.—चर योगादि त्रयोदश योग आणि वार ७ असे कोष्टकांत लिहिले आहेत त्यांत ज्यावारीं नक्षत्र किंवा तिथी येईल त्यावारी तो योग जाणावा.

| योगाचीं नावें. | | रविवार. | सोमवार | मंगळवार | बुधवार. | गुरुवार. | शुक्रवार. | शनिवार |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | चरयोग. | पूर्वाषा० | आर्द्रा- | विशाखा | रोहिणी | पुष्य. | मघा | मूळ |
| २ | क्रकच. | १२तिथि | ११तिथि. | १०तिथि | ९ तिथि | ८ तिथि | ७ तिथि | ६ तिथि |
| ३ | दग्धयोग. | १२तिथि | ११तिथि. | ५ तिथि | ३ तिथि | ६ तिथि | ८ तिथि | ९ तिथि |
| ४ | मृत्युदा. | १<br>६ तिथि.<br>११ | २<br>७ तिथि.<br>१२ | १<br>६ तिथि<br>११ | ४<br>९ तिथि<br>१४ | २<br>७ तिथि<br>१२ | ३<br>८ तिथि<br>१३ | ५<br>१० तिथि<br>१५,३० |
| ५ | सिद्धियो० | ० | ० | ३<br>८ तिथि<br>१३ | २<br>७ तिथि<br>१२ | ५<br>१० तिथि<br>१५,३० | १<br>६ तिथि<br>११ | ४<br>९ तिथि<br>१४ |
| ६ | उत्पात. | विशाखा | पूर्वाषा० | धनिष्ठा | रेवती. | रोहिणी | पुष्य | उत्तरा |
| ७ | मृत्युयो. | अनुरा० | उत्तराषा. | शतता० | अश्विनी | मृग | आश्ले० | हस्त |
| ८ | कालयो. | ज्येष्ठा. | अभिजि | पूर्वाभा० | भरणी | आर्द्रा. | मघा | चित्रा |
| ९ | सिद्धियो. | मूळ. | श्रवण. | उत्तराभा. | कृतिका | पुनर्वसु | पुर्वा | स्वाती |
| १० | यमदंष्ट्र योग. | मघा<br>धनिष्ठा. | मूळ<br>विशाखा | कृतिका<br>भरणी. | पूर्वाषा०<br>पुनर्वसु | उत्त.षा०<br>अश्विनी | रोहिणी<br>अनुरा० | श्रवण<br>शततार |
| ११ | यमघंट. | मघा | विशाखा | आर्द्रा | मूळ | कृतिका | रोहिणी | हस्त |
| १२ | मुसलवज्र. | भरणी | चित्रा | उत्त.षा० | धनिष्ठा | उत्तरा. | ज्येष्ठा | रेवती |
| १३ | अमृतसि. | हस्त | मृग | अश्विनी | अनुरा | पुष्य | रेवती | रोहिणी |

## दास व दासी ठेवण्यास मुहूर्त.

### दासचक्र.

नराकारंलिखेच्चक्रंसेवार्थंभृत्यसंग्रहे ॥ शीर्षेत्री-
ण्यर्थलाभःस्यान्मुखेत्रीणिविनाशनं ॥ १ ॥ ह-

दिपंचधनंधान्यंपादेषट्कंदरिद्रता ॥ पृष्ठेद्वेप्रा-
णसंदेहोनाभौवेदाशुभावहं ॥ २ ॥ गुह्येद्वेभय-
पीडेचदक्षहस्तेकमर्थदं॥एकंवामेनाशकरंभृत्य-
भात्स्वामिभांतकं ॥ ३ ॥

अर्थ.—नराकार चक्र काढून त्याचे मस्तकापासून अवयवस्थानीं नक्षत्रें घावयाचीं त्यांचा क्रम. दासाचे जन्म नक्षत्रापासून स्वामीचे नक्षत्रा पावेतों प्रथम शीर्षावर ३ अर्थ लाभ, मुखावर ३ नाश, हृदयावर ५ धनधान्य समृद्धि, मग पायावर ६ दरिद्र, पृष्ठावर २ मृत्यु, पुढें नाभीवर ४ शुभ, गुदावर २ भय आणि पीडा, नंतर उजवे हातावर १ अर्थ प्राप्ति व ९ वें स्थान डाव्या हातावर १ नाश.

## दासीचक्र.

दासीचक्रंप्रवक्ष्यामिदासीभात्स्वामिभांतिकं ॥
शीर्षेत्रीणिमुखेत्रीणिस्कंधयोश्चद्वयंस्मृतं ॥१॥
हृदयेपंचऋक्षाणिनाभौपंचभगेकंकं ॥ जानुद्व-
येद्वयंज्ञेयंपादयोश्चत्रयंत्रयं ॥ २ ॥ फळ ॥
शिरस्थानेभवेल्लाभोमुखेहानिःप्रजायते ॥ स्कं-
धेचस्वामिनोमृत्युर्हृदयेपुष्टिवर्धनं ॥ ३ ॥ ना-
भौहानिप्रदंप्रोक्तंभगेचैवपलायनं ॥ जान्वोसे-
वालभेन्नित्यंपादयोस्तुधनक्षयः ॥ ४ ॥

अर्थ.-दासीचे जन्मनक्षत्रापासून स्वामीचे जन्मनक्षत्रा पावेतों घावयाचीं स्थानें—प्रथम शीर्षावर ३ लाभ, पुढें मुखावर ३ हानि, खांद्यावर २ स्वामि मृत्यु, हृदयावर ५ पुष्ट होय, नाभीवर ५ हानि, भगावर १ पळेल, ढोंपरांवर २ सेवा करील, पायांवर ६ धनक्षय कारक यांतून शुभ असल्यास ठेवावी.

## गवादिपशू घेण्यास मुहूर्त.

## गोवृष महिषी चक्रं.

शीर्षेत्रयंमुखेद्वेचपादेष्वष्टौविनिर्दिशेत् ॥ हृदये

पंचऋक्षाणिस्तनेष्वष्टौभगेकर्कं ॥ १ ॥ फळ ॥ शिरस्थानेभवेल्लाभोमुखेहानिःप्रजायते ॥ पादयोरर्थलाभःस्याद्धृदयेसौख्यवर्धनं ॥ २ ॥ स्तनयोस्तुमहालाभोभगस्थानेमहद्भयं ॥ अर्यमादिगवांज्ञेयंमाहिष्यांसूर्यभान्न्यसेत् ॥ इदमेववृषेज्ञेयंविशेषःपत्सुषोडश ॥ ७२ ॥

अर्थः—गाय अथवा बैल घेण्यास उत्तरा फाल्गुनी पासून दिवस नक्षत्रा पर्यंत घावयाचीं स्थानें:—प्रथम मस्तकावर ३ लाभदायक, मग मुखावर २ हानि, पायांवर ८ अर्थलाभ, हृदयावर ५ सौख्य, स्तनावर ८ महालाभ, भगावर १ प्रजावृद्धि, व भय अशीं फळें जाणावीं आणि महिषी घेण्यास हींच स्थानें व फळें परंतु सूर्यनक्षत्रा पासून दिवसनक्षत्रा पावेतों क्रम जाणावा. आणि वृषभ घेण्यास स्थानें व नक्षत्रें यांचा क्रम गाईचा घ्यावा, परंतु पायाचें स्थानीं १६ नक्षत्रें घावीं आणि शेष २ दोन योजून शुभ फळ येईल तें घ्यावें.

## अश्व घेण्यास मुहूर्त.

अश्वेतुसूर्यभाच्चैवसाभिजिज्जन्मभान्यसेत् ॥ पंच स्कंधेजन्मभांतंपृष्ठेतुदशकंन्यसेत् ॥ १ ॥ पुच्छे ज्ञेयंद्वयंप्राज्ञैश्चतुष्पादेचतुष्टयं ॥ उदरेपंचधिष्ण्यानिमुखेद्वेचप्रकीर्तिते ॥ २ ॥ फळ ॥ सौभाग्यमर्थलाभंचस्त्रीनाशोरणभंगता ॥ नाशश्चअर्थलाभश्चफलंप्रोक्तंमनीषिभिः ॥ ३ ॥

अर्थः—सूर्य नक्षत्रा पासून आपले जन्म नक्षत्रा पावेतों घावयाचा क्रम स्थानें व फळेः—प्रथम स्कंधावर ५ सौभाग्य, पुढें पृष्ठावर १० अर्थ लाभ, मग पुच्छावर २ स्त्रीनाश, पायांवर ४ रणभंगता, उदरावर ५ नाश, मग तोंडावर २ अर्थ लाभ यांत शुभ फळ येईल तें घ्यावें.

## गज घेण्यास मुहूर्त.

गजाकारंलिखेत्त्वक्षंजन्मभांतेचसूर्यभात् ॥ कर्णे-

शीर्षेद्विजेपुच्छेद्वयंसर्वत्रयोजयेत् ॥ १ ॥ शुंडा-
यांतुद्वयंयोज्यंवेदाःपृष्ठ्युदरेमुखे॥ षट्संख्याके
तुपादेषुसाभिजिद्वैन्यसेत्क्रमात् ॥ २ ॥ फळ ॥
कर्णेचैवमहान्लाभोमस्तकेलाभएवच ॥ दंते
चैवभवेल्लाभोपुच्छेहानिःप्रजायते ॥ ३ ॥ शुंडा-
यांतुशुभंज्ञेयंपृष्ठेतुसुखसंपदः ॥ उदरेरोगसंभू
तिर्मुखेतुमध्यमंस्मृतं ॥ पादयोश्चभवेल्लाभोगजे-
चैवंविनिर्दिशेत् ॥ ४ ॥

अर्थ.—पूर्वी सूर्य नक्षत्रापासून घावयाचा क्रम सांगितला आहे परंतु स्थानें, फळें व नक्षत्रांची संख्या निराळी सांगतों ती अशी कीं, प्रथम कर्णावर दोन लाभ, मग मस्तकावर २ लाभ, पुढें दांतावर २ लाभ, पुच्छावर २ व सोंडेवर २ शुभ, पृष्ठावर ४ सुखसंपदा, पोटावर ४ रोग तोंडावर ४ मध्यम, शेवटीं पायांवर ६ लाभ असें जाणावें.

## शिबिकाद्यारोहण चक्रमुहूर्त.

सूर्यभाद्दिनभर्यंयावत्पंचपंचचतुर्दिशं ॥ मध्येतु
सप्तदेयानिचक्रंज्ञेयंसुखासनं ॥ १ ॥ फळ ॥ पूर्व-
भागेतुचारोग्यंदक्षिणेकष्टकारकं ॥ पश्चिमेकृश-
ताचेवउत्तरेव्याधिसंभवः ॥ २ ॥ मध्यस्थंचशुभं
प्रोक्तमायुर्वृद्धिकरंपरं ॥ पालकारोहणंचेतद्बालक-
स्यबुधैर्हितं ॥ ३ ॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों पालखी अथवा पाळणा यांतून ज्यावर आरोहण करावयाचें असेल त्यांचे चहूं दिशांस व मध्यभागीं घावयाचा क्रम. पूर्वभागी ५ आरोग्य, दक्षिणेस ५ कष्टकारक, पश्चिमेस ५ कृशता, उत्तरेस ५ व्याधिनाश आणि मध्यें ७ नक्षत्रें शुभकारक व आयुष्याची वृद्धि करणारीं यांतून शुभ फळ येईल तो दिवस घ्यावा.

## छत्रचक्र.

त्र्युत्तरारोहिणीरौद्रपुष्पश्चशततारकाः ॥ धनिष्ठा

श्रवणेचैवशुभानिछत्रधारणे ॥१॥ चक्र ॥ मूले-
त्रयंसप्तदंडेकंठेचैवतुपंचकं ॥ मध्येवसुप्रदातव्यं
शिखरेवेदएवच ॥ फळ ॥ मूलेचजायतेनाशो
दंडेहानिर्धनक्षयः ॥ कंठेचराजसन्मानंमध्येछत्र-
पतिर्भवेत् ॥ शिखरेकीर्तिवृद्धिश्चजन्मभात्सूर्यभां-
तकं ॥ ३ ॥

अर्थ.—३ उत्तरा, रोहिणी, आर्द्रा, पुष्य, शततारका, धनिष्ठा, श्रवण, हीं नक्षत्रें शुभ होत; परंतु आपले जन्मनक्षत्रापासून सूर्य नक्षत्रापावेतों घाववयाचा क्रम. प्रथम मुळावर ३ जीवनाश, दंडावर ७ हानि, धनक्षय, कंठावर ५ राजसन्मान, मध्य ८ छत्रपति, शिखरावर ४ कीर्तिवृद्धि होय यांतून शुभ फळ येईल तो दिवस घ्यावा.

### मंचकचक्र.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंमंचमूलेचतुश्चतुः ॥ गात्रेषुत्वे-
कंविंध्यासुमध्येसप्तविनिर्दिशेत् ॥ १ ॥ फल ॥
मूलेतुसुखसौभाग्यंगात्रेविंध्येभयंमहत् ॥ मध्ये-
सत्पुत्रलाभायआयुर्वृद्धिकरंपरं ॥ २ ॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों मंचक स्थानीं घाववयाचा क्रम. प्रथम खुरावर १६ सुखप्राप्ति, मग गात्रांवर ४ भयप्राप्ति, पुढें विंध्यांवर १ भय, शेवटीं मध्यभागीं ७ पुत्रलाभ व आयुर्वृद्धि.

### सशरधनुश्चक्र.

सूर्यभाज्जन्मभांतंचधनुषेचैवयोजयेत् ॥ चापा-
ग्रेबाणसंख्याकंशराग्रेपंचयोजयेत् ॥ १ ॥ श-
रमूलेतथापंचपंचसंधौप्रकीर्तयेत् ॥ दंडेचैकतु
दद्याद्वैधनुषश्चक्रमुत्तमं ॥ २ ॥ फल ॥ अग्रेहा-
निःशरेलाभोशरमुलेजयस्तथा चापसंधौतुशौ-
र्यस्याद्दंडेभंगःप्रजायते ॥ ३ ॥

अर्थः—सूर्य नक्षता पासून जन्म नक्षत्रा पावेतों धनुष्यावर द्यावयाचीं स्थानें व फलें सांगतों.— प्रथम अग्रावर ५ हानि, मग शरावर ५ लाभ, शरमूळावर ५ जय, संधीवर १० शौर्य, आणि शेवटीं दंडावर २ राज्य भंग यांतून शुभ फल येईल या त्यादिवशीं धारण करावें.

## रथचक्र.

रथाकारंलिखेच्चक्रंसूर्यभाच्चनियोजयेत् ॥ रथाग्रे त्रीणिऋक्षाणिषट्चसर्वत्रयोजयेत् ॥ १ ॥ फल ॥ शृंगेमृत्युर्जयश्चक्रेसिद्धिर्ज्ञेयाचदंडके ॥ रथाग्रेदंडअध्वानंमध्येचैवसुखंशुभं ॥ २ ॥ बुधैरेवंफलं ज्ञेयंजन्मभांतंक्रमेणच ॥ गर्गेणोक्तानिचक्राणि-विज्ञेयानिसदाबुधैः ॥ ३ ॥

अर्थः—रथाकार चक्र काढून त्याचे स्थानांवर सूर्य नक्षता पासून जन्म नक्षत्रा पावेतों, द्यावयाचा क्रम. प्रथम शृंगार ३ मृत्यु, मग चाकांवर ६ जय, पुढें मध्य दांडीवर ३ सिद्धि, रथाग्रावर ३ धनलाभ, मग जोकडावर ३ भंग शेवटी मार्गावर ६ शुभ व सुख जाणावें.

## तिळांचाघाणालावण्यासमुहूर्त.

घाणाचक्रंप्रवक्ष्यामिसूर्यभाच्चांद्रमेवच ॥ त्रीणित्रीणित्रयंत्रीणित्रीणित्रीणित्रयंतथा ॥ त्रीणित्रीणितुभान्यत्रयोजयेत्घाणकेशुभे ॥ १ ॥ फल ॥ हानिरैश्वर्यमारोग्यंविनाशोद्रव्यमेवच ॥ स्वामिघातोनिर्धनतामृत्युरेवसुखंक्रमात् ॥ २ ॥

अर्थ.—सूर्य नक्षता पासून चंद्र नक्षत्रा पावेतों घाणा चक्रास भाग ९ त्यांचीं फळें लिहितों.

३ प्रथम भाग. ............ हानि. ३ पं० भाग. ............ स्वामिघात
३ द्वि० भाग. ............ ऐश्वर्य. ३ स० भाग. ............ निर्धनत्व.
३ तृ० भाग. ............ आरोग्य. ३ अ० भाग. ............ मृत्यु.
३ च० भाग. ............ नाश. ३ न० भाग. ............ सुख.
३ पं० भाग. ............ द्रव्य. यांत शुभ फळ ज्या दिवशीं येईल तो घ्यावा.

## उसांचा रस काढावयास मुहूर्त.

वेदाद्विनेत्रभूभूतबाणहस्तरसाःक्रमात् ॥ फल ॥
प्रथमेचलभेल्लक्ष्मींद्वितीयेहानिरेवच ॥ १ ॥
तृतीयेसर्वलाभश्चतुर्थेचक्षयस्तथा ॥ पंचमे
चभवेन्मृत्युःषष्ठंस्थानंशुभंस्मृतं ॥ २ ॥ स-
प्तमेचैवपीडास्यादष्टमेधनधान्यदं ॥ सूर्यभा-
द्गणयेच्चांद्रमिक्षुयंत्रेणयोजयेत् ॥ ३ ॥

| | | |
|---|---|---|
| ४ | प्रथम भाग............ | लक्ष्मी. |
| २ | द्वि॰ भाग............ | हानि. |
| २ | तृ॰ भाग............ | सर्वलाभ. |
| १ | च॰ भाग............ | क्षय. |
| ५ | पं॰ भाग............ | मृत्यु. |
| ५ | ष॰ भाग............ | शुभ. |
| २ | स॰ भाग............ | पीडा. |
| ६ | अ॰ भाग............ | धन धान्य. |

अर्थ.-सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों मोजून त्यांत शुभ फळ ज्या दिवशीं येईल तो घ्यावा.

## कृषिकर्मास मुहूर्त

स्वातीब्राह्ममृगोत्तरादितियुगेराधाचतुष्कंमघारे-
वत्युत्तरविष्णुभंकृषिविधौक्षेत्रादिवापेविधौ ॥ गो
कन्याझषमन्मथाश्चशुभदावाराःकुजार्कितरेषष्ठी
द्वादशिरिक्तपर्वसुतथावर्ज्योद्वितीयाद्वयं ॥ १ ॥

अर्थ.—स्वाती, रोहिणी, मृग, उत्तरा, पुनर्वसु, पुष्य, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, मघा, उत्तराषाढा, श्रवण, हीं नक्षत्रें आणि वृषभ, कन्या, मीन, मिथुन हीं लग्नें शुभ होत. मंगळ, शनि हे वार आणि षष्ठी, द्वादशी, रिक्ता, दोन्हीं पर्वणी आणि द्वितीया द्वय ही वर्ज करून कृषिकर्मास व बीज पेरण्यास आरंभ करावा.

## हलचक्र.

त्रिकंत्रिकंत्रिकंपंचात्रिकंपंचात्रिकंत्रिकं ॥ सूर्यभाद्ग
णयेच्चांद्रमशुभंचशुभंक्रमात् ॥ १ ॥

अर्थ.—प्रथम नांगर धरण्यास मुहूर्त. सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रा-

पावेनों गणून त्याचे ८ भाग करावे. त्याचा क्रम.प्रथम भाग३फळ अशुभ, द्वितीय भाग ३ शुभ. तृतीय भाग ३ अशुभ, चतुर्थ भाग ५ शुभ, पंचम भाग ३ अशुभ, षष्ठ भाग ५ शुभ, सप्तम भाग ३ अशुभ, अष्टम भाग३ नक्षत्रें शुभ, ज्या नक्षत्र भागामध्ये दिवस नक्षत्र शुभ येईल तो दिवस घ्यावा.

## गलबताचें चक्र.

रविभुक्तर्क्षमारभ्यकुर्यात्रीण्युदयेचषट् ॥ नाल्यां त्रीणिहृदित्रीणिपृष्ठेभूःपार्श्वगंत्रयं ॥ शुकाणेत्रीणि षण्मध्येनौकाचक्रेंभसांस्थितिः ॥ उपरिस्थंचमध्यस्थंषट्श्रेष्ठंचपरंनसत् ॥ १ ॥

अर्थ—रविभुक्त नक्षत्रापासून तीन तीन नक्षत्रें देण्याचा क्रम. प्रथम उपरिस्थानीं ६ द्यावी, पुढें गलबताचे नाळीवर ३, मग हृदयावर ३, पृष्ठावर १, कुशीवर ६, सुकाणावर ३, नौकेचे मध्यभागी ६ नक्षत्रें द्यावी. त्यांत उपरिस्थ आणि मध्य स्थानाची नक्षत्रें शुभ व अन्य स्थानाची अशुभ जाणावी.

## गलबताचें मुहूर्त.

पौष्णादितिस्तुरगवारुणमित्रचित्राशीतोष्णरश्मि वसुजीवकभान्यमूनि ॥ वारेचजीवभृगुनंदनके प्रशस्तोनौकादिसंघटनवाहनमेषुकुर्यात् ॥ १ ॥

अर्थ.—रेवती, पुनर्वसु, अश्विनी, शततारका, अनुराधा, चित्रा, मृग, हस्त, धनिष्ठा, पुष्य हीं नक्षत्रें व गुरु, भृगु हे वार प्रशस्त होत. यांजवर नवें गलबत बांधावें अथवा जलामध्यें सोडावें.

## लग्नीं ग्रहबळ पाहणें.

त्रिषडायखगःसूर्यचंद्रोद्विन्यायगःशुभः ॥ कुजार्कीत्रिषडायस्थौत्रिषट्खेतरगोगुरुः ॥ १ ॥ द्विसुतास्ताष्टरिःफायरिपुसंस्थोबुधःस्मृतः ॥ सुखांत्यारीन्विनायत्रनौयानेशुभदःसितः ॥ २ ॥

अर्थ.—गलबतांत बसावयाचें अथवा प्रथम हाकारणी करावयाची असल्यास लग्नी ग्रहबल पाहणें. तृतीय, षष्ठ, आणि एकादश या स्थानी सूर्य, भौम, शनैश्चर, हे असले तर शुभ आणि द्वितीय, तृतीय, एकादश या स्थानीं

चंद्र शुभ व ३,६,१० या स्थांना व्यतिरिक्त अन्य स्थानीं गुरु शुभ. २।५।७ ८।१२।६ या स्थानीं बुध शुभ आणि ४।१२।६ या स्थानाव्यतिरिक्त शुक्र अन्य स्थानीं शुभ होय.

## नौकास्थानींग्रह.

नाल्यांपापखगाःसौम्याःशुकाणेशुभकारकाः ॥
व्यस्तामृत्युकराःक्रूराःपृष्ठेकुक्षौचभीतिदाः ॥ १ ॥
अंतर्बाह्येस्थितास्तेचत्यलाभायास्थिताबुधैः ॥ ए-
वंविचार्यदैवज्ञोनौयानसमयंवदेत् ॥ २ ॥

अर्थ.—लग्न कुंडली मांडून त्यांत ग्रह कोण कोणते स्थानीं येतील त्यांचीं तस तसी फळें पाहावीं. पाप ग्रह नाळीवर शुभ, सौम्य ग्रह सुकाणावर शुभ. हें विपरीत असलें तर अशुभ आणि क्रूर ग्रह पृष्ठावर अथवा बाहेर आले तर लाभ नाहीं व भय याचा विचार करून जोशी यानें नौकायानास मुहूर्त सांगावें.

## दीपिकाचक्र.

दीपिकायामुखेपंचराजसन्मानलाभदं ॥ कंठेन-
वधनप्राप्तिर्मध्येऽष्टौस्वामिमृत्युदाः ॥ दंडेपंचभ-
वेद्राज्यमग्निऋक्षाच्चदपिकम् ॥ १ ॥

अर्थ.—कृत्तिका नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत धात्रयाचीं स्थानें व फलें सांगतों. तोंडावर ५ राजसन्मान लाभ, कंठावर ९ धनप्राप्ति, मध्यें ८ स्वामि मृत्यु, दांड्यावर ५ राज्यप्राप्ति या रीतीनें नक्षत्र क्रम नवीन. दीपस्थापनास जाणावा.

## कूपचक्र.

कूपवाप्योस्तुचक्रंवैविज्ञेयंविबुधैःशुभं ॥ रोहिणी
गर्भमेतस्यत्रित्रिऋक्षाणिचंद्रभं ॥ १ ॥ मध्येपूर्वे
तथाग्नेयंयाम्यांचैवतुनैर्ऋते ॥ पश्चिमेचैववायव्यां
सौम्यांशूलिदिशिक्रमात् ॥ २ ॥ ॥ फल ॥ शी-
घ्रंजलंनजलंमध्यमंजलंअजलंबहुजलंच ॥ अमृ-

तजलंबहुक्षारंसजलंमध्यमजलंक्रमात्फलंज्ञेयं ॥ ३॥ मत्स्येकुलीरेमकरेजलंबहुतथैवचार्धंवृषकुंभयोश्च ॥ अलिश्चतौलिर्जलसंज्ञिताचशेषेषुराशिष्वजलं-प्रकीर्तितं ॥ ४ ॥

अर्थ.—कूप, वापी, नूतन खोदण्यास मुहूर्त. रोहिणी नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों घ्यावयाचीं त्यांचा क्रम सांगतों. मीन, कर्क, मकर, या तीन राशींस चंद्र असतां पुष्कळ जल लागेल. कुंभ, वृषभ या दोन राशींस चंद्र असतां तदर्ध जल लागेल. वृश्चिक, तूळ या राशींस असतां अल्प जल लागेल. आणि शेष राशीस चंद्र असतां जल लागणार नाहीं.

## बागांत लागवड करण्यास मुहूर्त.

गोसिंहालिगतेषुचोत्तरगतेभानौबुधादित्रयेचंद्रा-केंचशुभाबुधैरभिहितारामप्रतिष्ठाक्रिया ॥

अर्थ.—उदगयनीं वृषभ, सिंह अथवा वृश्चिक या राशींचा सूर्य आणि बुध, गुरु, शुक्र, चंद्र असे असतां शुभदिनीं नूतन लागवड करावी.

आश्लेषाभरणीद्वयंशतभिषकृत्यत्काविशाखांकुहूंरि-
क्तापक्षतिमष्टमींपरिहरेत्षष्ठीमपिद्वादशीं ॥ १ ॥

अर्थ.—आश्लेषा, भरणी कृत्तिका, विशाखा, शततारका, आणि अ-मावास्या, रिक्तातिथि, द्वितीया, अष्टमी, षष्ठी, द्वादशी इतकीं, वर्जून अन्य दिनीं लागवड उक्त होय.

## शिकाचालविण्यासमुहूर्त.

मृदुध्रुवक्षिप्रचरेषुभेषुयोगेप्रशस्तेशनिचंद्रवर्जे ॥
वारेतथापूर्णजलेऽह्येचमुद्राप्रशस्ताशुभदाहिरा-
ज्ञां ॥ १ ॥

अर्थ.—मृदु,ध्रुव,क्षिप्र-चर हीं नक्षत्रें प्रशस्त वशनि,चंद्र हे वार वर्ज करावे.

## अथप्रश्नप्रकरणं.

## तिथ्यादियुक्तप्रश्नसांगणें.

तिथिप्रहरसंयुक्तंतारकावारमिश्रितं ॥ अग्निभि-
स्तुहरेद्भागंशेषंसत्वंरजस्तमः ॥ १ ॥ ॥ फल ॥
सिद्धिस्तात्कालिकेसत्वेरजसातुविलंबिता ॥ तम-
सानिष्फलंकार्यंज्ञातव्यंप्रश्नकाविदैः ॥ २ ॥

अर्थ.—ज्या वेळीं प्रश्न करील त्या वेळचे तिथि, वार, प्रहर नक्षत्र यांची संख्या एकत्र करून तिहींनीं भागून पुढें सांगितल्याप्रमाणें उत्तर सांगावें. उदाहरणः—तिथी ५ वार ३ नक्षत्रें ७ आणि प्रहर २ यांची एकंदर मिळवणी १७ भाग तिहींचा देतां भोग १५, शेष २ त्याचें नांव दु-सरें रज त्याचें फळ कार्यविलंब, ३ उरलें तर तम निष्फळ, १ उरला तर सत्व त्याचें फळ सिद्धि.

## आत्मच्छायायुक्त प्रश्न.

आत्मच्छायात्रिगुणितात्रयोदशसमान्विता ॥ व-
सुभिश्चहरेद्भागंशेषंचैवशुभाशुभं ॥ फल ॥ ला-

भश्चैकेत्रिकेसिद्धिर्वृद्धिः पंचमसप्तके ॥ द्वयोर्हानि-श्चतुःशोकंषष्ठाष्टेमरणंध्रुवं ॥ ४ ॥

अर्थ.—आपली छाया मोजून त्रिगुणित करुन त्यांत १३ मिळवून ८ नीं भागावी आणि शेष उरल त्यांचें फळ खाली लिहिल्याप्रमाणें जाणावें. शेष १ उरला तर लाभ, २ उरले तर हानि, ३ उरले तर सिद्धि, ४ उरले तर शोक, ५ उरले तर वृद्धि, ६ उरले तर मरण, ७ उरले तर वृद्धि आणि ० उ-रलें तर मरण.

## पंथा प्रश्न.

तिथिप्रहरसंयुक्तंतारकावारामिश्रितं ॥ सप्तभिस्तु हरेद्भागंशेषंप्रश्नस्यलक्षणं ॥ ५ ॥ वर्तमानंचन-क्षत्रंगणयेत्कृत्तिकादितः ॥ सप्तभिश्चहरेद्भागंशे-षंप्रश्नस्यलक्षणं ॥ ६ ॥ प्रश्नाक्षरंरुद्रयुतंसप्तभि-र्भाजितंतथा ॥ फलमेकंक्रमाज्ञेयंसर्वेषांहिशुभा-शुभं ॥ ७ ॥ फलें ॥ एकमेवतथास्थानेद्वितीये पथिवर्तते ॥ तृतीयेप्यर्धमार्गेतुचतुर्थेग्राममादि-शेत् ॥ ८ ॥ पंचमेतुपरावृत्तःषष्ठेव्याधियुतंव-देत् ॥ शुन्यंज्ञेयंसप्तमकेचैतत्प्रश्नस्यलक्षणं ॥ ९ ॥

अर्थ.—तिथी, वार, नक्षत्र, आणि प्रहर एकत्र करून त्या संख्येस ७ नीं भागावें आणि शेष उरेल त्यावरून फल पहावें. दुसरा प्रकार.—कृत्तिका-नक्षत्रापासून प्रश्नादिन नक्षत्रा पावेतों गणनाकरून सातानी भागावें. आणि शेष उरेल त्याचें फल पहावें. तिसराप्रकार.—प्रश्नाचीं अक्षरें मोजून त्यांत ११ मिळवून सातानी भागावें आणि शेष उरेल त्याचें फळ पहावें. शेष १ उरला तर स्थानीच आहे, २ उरले तर मार्ग चालत आहे, ३ उरले तर अर्ध मार्गी आला, ४ उरले तर गांवाजवळ आला, ५, उरले तर माघारा फिरला, ६ उ० व्याधिष्ट आहे आणि ० उ० मृत्यु हींच तिन्हीं पंथाप्रश्नाचीं फळें क्रमे करून जाणावी.

## दुसरा प्रकार.

धनसहजगतोसितामरेज्योकथयतआगमनंप्र-

वासिपुंसां॥ तनुहिबुकगताविभौचतद्वझ्झटिति
नृणांकुरुतोग्रहप्रवेशम् ॥ १० ॥

अर्थ.–द्वितीय स्थानीं शुक्र, तृतीय स्थानीं गुरु, अथवा पृच्छालग्नीं शुक्र आणि चतुर्थ स्थानी गुरु असा योग आला तर प्रवासी मनुष्य गृहास लौकर येईल.

## अथकार्याकार्य प्रश्न.

दिशाप्रहरसंयुक्तातारकावारामिश्रिता॥ अष्टभि-
स्तुहरेद्भागंशेषंप्रश्नस्यलक्षणं ॥ ११ ॥ फल ॥
पंचकेत्वरितासिद्धिःषट्तुर्येचदिनत्रयं ॥ त्रिस-
प्तकेविलंबश्चद्वौचाष्टौनचसिद्धिदौ ॥ १२ ॥

अर्थ.पृच्छकाचें मुख ज्या दिशेस असेल ती दिशा व प्रहर, वार, नक्षत्रें अशी सर्व एकत्र करून ८ नीं भागून शेष उरेल त्याचें शुभाशुभ फल जाणावें. शेष १ अथवा ५ उरले तर त्वरित कार्य सिद्धि जाणावी. ६, ४ उ० तर तीन दिवसांत कार्य सिद्धि. ३,७ विलंबें करून कार्य सिद्धि २,० उरलें तर कार्य होणार नाहीं.

## नवांक प्रश्न,

अर्कंद्विगुणितंकृत्वाफलनामाक्षरैर्युतं॥ त्रयोदश-
युतं कृत्वानवभिर्भागमाहरेत् ॥ १३ ॥ फळ ॥
एकेनधनवृद्धि श्चद्वितीयेचधनक्षयः ॥ तृतीये
क्षेममारोग्यंचतुर्थेव्याधिरेवच ॥ १४ ॥ पंचमे
वनितालाभःषष्ठेबंधुविनाशनं ॥ सप्तमेईप्सि-
तासिद्धिरष्टमेमरणंध्रुवं ॥ नवमेराज्यसंप्राप्तिर्ग-
र्गस्यवचनंयथा ॥ १५ ॥

अर्थ.–९ अंकांतून नांव घ्यावयास सांगावें आणि ज्या अंकाचें नांव येईल तो द्विगुणित करून नंतर फळाचें नांव घेववावें, आणि त्याची अक्षरें

घोजून दुसरे ११ अंक त्यांत मिळवावे आणि पूर्वी द्विगुणित केले ते व हे असे सर्व एकत्र करून नवानीं भागावें आणि शेष राहील त्याजवरून शुभाशुभ फळ पहावें. शेष १ उरला तर धनलाभ, दोन उरले तर धनक्षय, ३ उरले आरोग्य, ४ उ० व्याधि, ५ उ० स्त्रीलाभ, ६ उ० बंधुनाश, ७ उ० कार्यसिद्धि, ८ उ० तर मरण, ० उरले तर राज्यप्राप्ति असे गर्गमुनी सांगतात.

## नवग्रहात्मकयंत्र प्रश्न.

नवग्रहात्मकंयंत्रंकृत्वाप्रश्नंनिरीक्षयेत्॥फलंपूर्वोक्तमेवात्रद्रष्टव्यंप्रश्नकोविदैः ॥ १६ ॥

अर्थः—नवग्रहात्मक यंत्र करून त्यांतील अंकांचें अवलोकन करून किंवा अंकावर हात ठेवून किंवा उच्चार करवून जो अंक येईल त्याचीं फलें पूर्वी सांगितलीं आहेत तीं पाहून त्याप्रमाणें जाणावीं.

| | | |
|---|---|---|
| ४ | ३ | ८ |
| ९ | ५ | १ |
| २ | ७ | ६ |

## अन्यमतें.

सप्तत्रयांकाःकथयंतिवार्तांनवैकपंचत्वरितंवदंति ॥ अष्टौद्वितीयेनहिकार्यसिद्धीरसाश्ववेदाघटिकात्रयंच ॥ १७ ॥

अर्थः—अन्य मतें पूर्वीचे अंक सांगितले आहेत त्याप्रमाणें कृतिकरावयाची परंतु फलें निराळी तीं अशी की, शेष ७ अथवा ३ उरले तर वार्ता ऐकण्यांत येईल. ९, १, ५ उरले तर त्वरित कार्य होईल. ८, २ उरले तर कार्य होणार नाहीं. ६, ४ उरले तर तीन घटिकांनी कार्य होईल असें जाणावें.

## वारनक्षत्रप्रयुक्तपंथाप्रश्न.

बुधेचंद्रेतथामार्गेसमीपेगुरुशुक्रयोः ॥ रवौभौमे तथादूरेशनौचपरिपीड्यते ॥ १८ ॥ निर्जीवः सप्तऋक्षाणिसजीवोद्वादशेभवेत् ॥ व्याधितोनवऋक्षाणिसूर्यधिष्ण्यात्तुचांद्रभं ॥ १९ ॥

अर्थ.–बुधवारीं व सोमवारी प्रश्न केला तर मार्ग चालत आहे, गुरुवारीं व शुक्रवारीं समीप आला, रविवारीं व भौमवारीं दूर आहे, शनिवारी अनिष्ठ आहे. सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों घ्यावयाचा क्रम. प्रथम ७ नक्षत्रांत चंद्र आला तर निर्जीव झाला, द्वितीय १२ नक्षत्रांत चंद्र आल्यास जिवत आहे आणि तृतीय ९ नक्षत्रांत चंद्र असेल तर व्याधि उत्पन्न आहे असा पथा प्रश्न जाणावा.

## नष्टवस्तुप्रश्न.

तिथिवारंचनक्षत्रंलग्नंवान्हिविमिश्रितं ॥ पंचभि-
स्तुहरेद्भागंशेषंतत्वंविनिर्दिशेत् ॥ २० ॥ फळ ॥
पृथिव्यांतुस्थिरंज्ञेयमप्सुव्योम्निनलभ्यते ॥ तेज-
राज्ञाहृतंज्ञेयंवायौशोकंविनिर्दिशेत् ॥ २१ ॥

अर्थ.–तिथि, वार नक्षत्र आणि लग्न इतकी प्रश्न समयीं जीं असतील तीं एकत्र करून त्यांत ३ मिळवून एकंदरांस ५ नीं भागावें. शेष १ उरला तर पृथ्वींत आहे, २ उरले तर जलांत आहे, न लभ्यते ( सांपडणार नाहीं ) ३ उ० तर आकाशांत आहे मिळणार नाहीं, ४ उ० तेज राजानें वस्तुनेली आणि ५ उ० तर वायूनें नेली शोक असें जाणावें.

## गर्भिणीप्रश्न.

तत्पृच्छलग्नेरविजीवभौमेतृतीयसप्तेनवपंचमेच ॥
गर्भःपुमान्वैऋषिभिःप्रणीतश्चान्यग्रहेस्त्रीविबुधैः
प्रणीता ॥ २२ ॥

अर्थ.–गर्भिणी ज्या लग्नी प्रश्न करील त्या लग्नीं ग्रह पाहणें. प्रश्नलग्ना पासून तृतीय, सप्तम, नवम, पचम या स्थानीं रवि, गुरु, भौम असले तर पुत्र होईल अथवा या स्थानीं अन्य ग्रह असले तर कन्या होईल.

## मुष्टिप्रश्न.

मेषेरक्तंवृषेपीतंमिथुनेनीलवर्णकं ॥ कर्कैचपांडुरं
ज्ञेयंसिंहेधूम्रंप्रकीर्तितं ॥ कन्यायांनीलमिश्रंतुतु-
लायांपीतमिश्रितं ॥ वृश्चिकेताम्रमिश्रंचधनेपी-

तविमिश्रितं ॥ नक्रेकुंभेकृष्णवर्णंमीनेपीतंवदेत्सु-
धीः ॥ २४ ॥

अर्थ.—पृच्छकाचे मुष्टीत कोणत्यावर्णाची वस्तु आहे ती सांगावी. पृच्छा लग्न मेष असेल तर तांबडे वर्णाची वस्तु मुष्टीत आहे, वृषभ लग्न असेल तर पिवळी, मिथुनीं निळी, कर्की पांढरी, सिंहीं धूम्र वर्णाची, कन्या लग्नीं नील मिश्रित तूळीं पीतमिश्रित, वृश्चिकी ताम्रमिश्रित धनी पीतमिश्रित, मकरीं, कृष्ण-वर्ण कुंभी लोहगय आणि मीनी पीतवर्णाची वस्तू आहे असें जाणावें.

## लग्नपरत्वेंमनचिंतितप्रश्न.

मेषेचद्विपदांचिंतावृषेचिंताचतुष्पदः ॥ मिथुनेग-
र्भचिंताचव्यवसायस्यकर्कटे ॥ २५ ॥ सिंहेचजी-
वचिंतास्यात्कन्यायांचस्त्रियस्तथा ॥ तूलेचधन-
चिंताचव्याधिचिंताचवृश्चिके ॥ २६ ॥ चापेच
धनचिंतास्यान्मकरेशत्रुचिंतनं ॥ कुंभेस्थानस्य
चिंतास्यान्मीनेचिंताचदैविका ॥ २७ ॥

अर्थ.—लग्नपरत्वें प्रश्नाचें उत्तर. मेष लग्नी प्रश्न केला तर मनुष्याची चिंता आहे, वृषभ लग्नीं गाई, म्हशी इत्यादि चतुष्पदांची चिंता, मिथुनीं गर्भाची, कर्की व्यापाराची, सिंही जीवाची, कन्या लग्नी स्त्रीची, तूळी धनाची, वृश्चिकीं रोगाची, धनी धनाची, मकरी शत्रूची, कुंभी स्थानाची, आणि मीन लग्नी भूत पिशाचादिक दैविक अशा चिंता लग्नपरत्वें पृच्छकास सांगाव्या.

## संज्ञापरत्वेंलग्नाचींनांवें.

धातुर्मूलंजीवश्चरस्थिरद्विस्वभावाश्च ॥ मे-
षादयःक्रमेणज्ञातव्याःप्राश्निकैरेव ॥ २८ ॥

अर्थ.—मेषादि क्रमें करून द्वादश लग्नें त्यांचीं नांवें दोन दोन संज्ञेचीं सांगतों. धातु, चर अशी मेष लग्नाची संज्ञा; मूल, स्थिर वृषभाची; जीव द्विस्वभाव मिथुनाची; धातु, चर कर्काची; मूल, स्थिर सिंहाची; जीव, द्विस्वभाव कन्येची; धातू, चर तूळेची, मूल, स्थिर वृश्चिकाची; जीव, द्विस्वभाव धनाची; धातू, चर मकराची, मूल, स्थिर कुंभाची; जीव, द्विस्वभाव मीनाची अशी द्वादश लग्नाची संज्ञा जाणावी.

## अंक प्रश्न.

अष्टोत्तरशतेचैवप्राश्निकोन्यूनमाचरेत् ॥ शेषंद्वा-
दशभिर्भक्तंशेषंचैवशुभाशुभं ॥ २९ ॥ फलं ॥
एकेदुर्गासप्तकेवैविलंबश्चागेतुर्येदिक्षुभूतेषुनाशः ॥
रुद्रेसिद्धिर्युग्मकेटद्धिरुक्ताशीघ्रंकार्यंस्यात्रिषद्द्वा-
दशेषु ॥ ३० ॥

अर्थ.—पृच्छकाकडून अष्टोत्तरशत अंकांतून एका अंकाचें नांव घेववावें आणि त्या अंकापासून राहिलेले पुढील अंक १२ नीं भागून जें शेष उरेल त्याचीं फळें पाहावीं. शेष १,९,७ उरले तर विलंबकरून कार्य होईल. ८,४, १०,५ उरले तर कार्यनाश. ११ उरले तर सिद्धि. २ उरले तर वृद्धि. आणि ३,६,० उरले तर शीघ्र कार्यसिद्धि होईल.

## बाधाप्रश्न.

तिथिवारंचनक्षत्रंलग्नंप्रहरमेवच ॥ अष्टभिस्तु
हरेद्भागंशेषंतुफलमादिशेत् ॥ ३१ ॥ हयाग्निदेव-
ताबाधापितरोनेत्रदंतिनः ॥ षट्चतुर्भूतबाधाच
नबाधाएकपंचके ॥ ३२ ॥

अर्थ.—तिथि, वार, नक्षत्र, लग्न आणि प्रहर हीं सर्व पृच्छा समयीं जीं असतील तीं एकत्र करून ८ नीं भागावीं आणि शेष उरेल त्यावरून फलें पाहावीं. शेष ७ अथवा ३ उरले तर देवतेची बाधा. २, ८ उरले तर पितरांची बाधा. ६,४ उरले तर भूतबाधा. आणि ५,१उरले तर बाधा नाहीं

## केवळ लग्नपरत्वें प्रश्न.

मेषेचदेविदोषःस्यात्वृषेदोषस्तुपैतृकः ॥ मिथु-
नेशाकिनीदोषःकर्कटेभूतदोषकः ॥ ३३ ॥ सिंहे
सहोदराःप्रोक्ताःकन्यायांकुलमातरः ॥ तूलेदोष-
श्चंडिकायानाडिदोषोहिवृश्चिके ॥ ३४ ॥ चापे-

चयक्षिणीपीडामकरेग्रामदेवता ॥ अपुत्रदर्शनी
कुंभेमीनेआकाशगामिनः ॥ ३५ ॥

अर्थ.—ज्या लग्नीं रोगी प्रश्न करील त्याचें उत्तर. मेष लग्नीं देवि दोष, वृषभ लग्नीं पितृदोष, मिथुनी शाकिनी दोष, कर्की भूतदोष, सिंहीं भावाचा दोष, कन्या लग्नी कुलदेवतेचा दोष, तूळी चंडिका दोष, वृश्चिकीं नाडिदोष, धनी यक्षिणी दोष, मकरी ग्रामदेवतेचा दोष, कुंभीं अपुत्रकी दर्शनीय दोष, मीन लग्नी आकाशगामिनीय दोष, असे पृच्छा लग्न परत्वें रोग सांगावे.

## पर्जन्यप्रश्न.

आषाढस्यासितेपक्षेदशम्यादिदिनत्रये ॥ रोहि-
णीकालमाख्यातिसुमदुर्भिक्षलक्षणं ॥ ३६ ॥ रा-
त्रावेवनिरभ्रंस्यात्प्रभातेमेघडंबरं ॥ मध्यान्हेज-
लबिंदुःस्यात्तदादुर्भिक्षकारणं ॥ ३७ ॥

अर्थ.—आषाढ कृष्णपक्षींची दशमीं एकादशी आणि द्वादशी या तीन तिथींत रोहिणी दिवस नक्षत्र आलें तर सुभिक्ष, मध्यम आणि दुर्भिक्ष हीं तीन फलें क्रमें करून घ्यावी. आणि रात्री निरभ्र, प्रातःकाली मेघगर्जना आणि मध्यान्हीं जलबिंदु पडल्यास त्या संवत्सरीं महर्घता होईल असें जाणावें.

## जललग्नें.

कुंभकर्कवृषोमीनंमकरोवृश्चिकस्तुला ॥ जलल-
ग्नानि चोक्तानिलग्नेष्वेतेषुसूर्यभं ॥ विशत्येवस-
दावृष्टिर्ज्ञातव्यागणकोत्तमैः ॥ ३८ ॥

अर्थ.—कुंभ, कर्क, वृषभ, मीन, मकर, वृश्चिक, तूळ हीं सात जललग्नें होत यांवर सूर्य महानक्षत्र निघालें तर पर्जन्य पुष्कळ पडेल.

## पर्जन्य नक्षत्रें.

अश्विनीमृगपुष्येषुपूषाविष्णुमघासुच ॥ स्वा-
त्यांप्रविशतेभानुर्वर्षतेनात्रसंशयः ॥ ३९ ॥

अर्थ.—अश्विनी, पुष्य, मृग, रेवती, श्रवण, मघा, स्वाती या दिवस नक्षत्रीं सूर्यानें महानक्षत्रीं प्रवेश केला असतां पर्जन्य पुष्कळ पडेल.

### स्त्रीनपुंसक पुरुष नक्षत्रें.

आर्द्रादिदशकंस्त्रीणांविशाखात्रिनपुंसकं ॥ मूला-
श्चतुर्दशेपुंसांनक्षत्राणिक्रमात्तद्बुधैः ॥ ४० ॥ वा-
युर्नपुंसकेभेचस्त्रीणांभेचाभ्रदर्शनं ॥ स्त्रीणांपु-
रुषसंयोगेवृष्टिर्भवतिनिश्चितं ॥ ४१ ॥

अर्थ.—आर्द्रादि स्वात्यंत १० नक्षत्रें स्त्री संज्ञक होत; विशाखादि ज्येष्ठांत तीन नक्षत्रें नपुंसक; मूलादि मृगांत १४ पुरुष संज्ञक होत. नपुंसकदिन नक्षत्रीं स्त्री महानक्षत्र आलें तर वायु सुटेल आणि दोन्ही स्त्री नक्षत्रें आलीं तर अभ्र येईल आणि स्त्री पुरुष असा योग आला तर पर्जन्य वृष्टि होईल.

### सूर्यवचंद्रनक्षत्रेंयांचीसंज्ञा.

अश्विन्यादित्रयंचैवआर्द्रायाःपंचकंतथा ॥ पूर्वा-
षाढादिचत्वारिचोत्तरारेवतीतथा ॥ ४२ ॥ उ-
क्तानिशशिभान्यत्रप्रोच्यंतेसूर्यभान्यथ ॥ फल ॥
रोहिण्यादिमृगश्चैवपूर्वाफाल्गुनिकातथा ॥ ४३ ॥
सूर्यःसूर्येभवेद्वायुश्चंद्रेचंद्रोनवर्षति ॥ सूर्यश्चं-
द्रेभवेद्योगस्तदावर्षतिमेघराट् ॥ ४४ ॥

अर्थ.—अश्विनी, भरणी, कृत्तिका, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, उत्तरा, रेवती, हीं चंद्र नक्षत्रें आणि शेष जीं उरलीं तीं सूर्य नक्षत्रें जाणावीं. फळ दिवस नक्षत्र आणि महानक्षत्र हीं दोन्हीं सूर्याचींच असलीं तर वायु सुटेल आणि दोन्हीं चंद्रनक्षत्रें असलीं तर पर्जन्य पडणार नाहीं. जेव्हां चंद्र व सूर्य यांचीं नक्षत्र एकत्र होतील तेव्हां वृष्टि होत्ये असें जाणावें.

### धान्य प्रश्न.

कापायेजयशर्मलाभकुगिरौमित्राणिसर्वेशुभंगो-
राये प्रियभुग्धनानिलपरेलाभारिनाशादिकं ॥

रैयंगेकलहःश्रियश्चबलगेस्थानानिमित्रागमोरो-
रारांविपदःपरांगकलहःखालेयशोकावहः ॥ ४५ ॥

अर्थ.—२७ दाणे धान्याचे घेऊन एक राश करावी. मग त्या राशीतून एक चिमटी भरून धान्यकण घेऊन निराळे ठेवावे ह्मणजे ३ राशि होतात, त्यांतील दाणे मोजून शेवटी एकेक उरला तर शुभ; असें लिवार पहावें. उदाहरण.—का म्हणजे १, पा म्हणजे १, ये म्हणजे १, अशा तीन राशी-तील ३ तीन दाणे काढून शेवटी १ एक तिन्ही राशीत उरला; तर त्याचें फळ जय आणि लाभ.

२. कु म्ह० १ गि ह्म० ३, रौ ह्म० २ असे आल्यास मित्रादि सर्व शुभ.
३ गो म्ह० ३, रा ह्म० २, ये म्ह० १ प्रिय भोग व धन प्राप्ति.
४. ल ह्म० ३, प ह्म० १, रे ह्म० २ लाभ आणि अरीचा नाश.
५. रै म्ह० २, यं म्ह० १, गे ह्म० ३ कलह होईल.
६. व ह्म० ३, ल ह्म० ३, गे म्ह० ३ लक्ष्मी आणि मित्र आपले घरी येईल,
७. रो म्ह० २ रा म्ह० २, रां म्ह० २ विपत्ति प्राप्त होतील.
८. प. म्ह० १, रां म्ह० २ ग म्ह० ३ कलह होईल.
९, खा. म्ह० २, ले म्ह० ३, य म्ह० १शोकप्राप्ति; असें लिवार केलें असतां ही नऊ फळें येतात आणि राशि मोजते वेळेस तीन तीन दाणे मोजावें.

## गुरूं चुकलेल्याचा प्रश्न.

द्युमणिभान्नवभेषुवनेपशुंतदनुषट्सुहिग्रामपथें
स्थितं ॥ अचलभेषुगतंगृहमागतंद्वयगतंगतमे
वमृतंत्रिषु ॥ ४६ ॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों प्रथम ९ नक्षत्रांत आलें तर गुरूं वनांत आहे, पुढें ६ नक्षत्रांत आलें तर गुरूं मार्गी आहे, त्यापुढें ७ नक्षत्रांत आलें तर गृहास लवकर येईल, त्यापुढें २ नक्षत्रांत आलें तर गुरूं सांपडणार नाही, नंतर ३ नक्षत्रांत आलें तर गुरूं मृत्यु पावलें असें जाणावें.

## राज्यभंगादि दोष.

यदिभवतिकदाचिच्चाश्विनीनष्टचंद्राशनिरवि-
कुजवारेस्वातिरायुष्मयोगे ॥ गगनचरपशू-

नांजंगमस्थावराणांनृपतिजनविनाशोराज्यभं-
गस्तुचोक्तः ॥ ४७ ॥

अर्थ.—कदाचित् शनि, रवि, भौम या वारीं अमावास्येस अश्विनी किंवा स्वाती नक्षत्र आणि आयुष्मान् या नांवाचा योग आला तर पक्षी, पशु, जंगम स्थावर व राजे यांचा नाश आणि राज्यभंग होईल.

### रविचंद्रासखळेंपडतेंत्याचेंफळ.

रविशशिपरिवेषेपूर्वयामेचपीडारविशशिपरिवे-
षेमध्ययामेचवृष्टिः ॥ रविशशिपरिवेषेधान्यना-
शस्तृतीयेरविशशिपरिवेषेराज्यभंगश्चतुर्थे ॥४८॥

अर्थ.—सूर्याला किंवा चंद्राला खळें प्रथम प्रहरीं पडलें तर जनास पीडा होईल, दुसरे प्रहरीं पडलें तर पर्जन्य पडेल, तिसरे प्रहरीं धान्याचा नाश होईल आणि चतुर्थ प्रहरीं पडलें तर राज्यभंग होईल.

### धनुष्याचें फळ.

रात्रौधनुर्दिनेउल्काताराचैवदिनेतथा ॥ रात्रौ-
तुधूमकेतुश्चभूकंपश्चतथैवहि ॥ एतानिदुष्टचि-
न्हानिदेशक्षयकराणिच ॥ ४९ ॥

अर्थ.—रात्रीस धनुष्य व दिवसास आकाशांत अग्निज्वालाप्रमाणें, नक्षत्रपात आणि रात्रीस धूमकेतु व भूकंप अशीं दुष्ट चिन्हें झालीं तर तीं देशक्षयकारक जाणावीं.

## अथग्रहचक्रप्रकरणं.

सूर्य ॥ ऋक्षेसंक्रमणेयत्रद्वेवक्रेविनियोजयेत् ॥
चत्वारिदक्षिणेबाहौत्रीणित्रीणिचपादयोः ॥ १ ॥
चत्वारिवामबाहौचहृदयेपंचानिर्दिशेत् ॥ अक्ष्णो-
र्द्वयंद्वयंयोज्यंमूर्ध्निचैकैककंगुदे ॥ २ ॥ फल ॥
रोगोलाभस्तथाध्वाचबंधनंलाभएवच ॥ ऐश्व-
र्यंराजपूजांचस्वल्पमृत्युरितिक्रमात् ॥३॥ चंद्र ॥

चंद्रचक्रंप्रवक्ष्यामिनराकारंसुशोभनं ॥ शीर्षेष-
ट्कंमुखेत्वेकंत्रीणिदक्षिणहस्तके ॥४॥ हृदिषट्-
कंप्रदातव्यंवामहस्तेत्रयंतथा ॥ कुक्ष्योःषट्कं
चदातव्यंपादेकैकंविनिर्दिशेत् ॥ ५ ॥ फल ॥
मुखेचद्रव्यहरणंशीर्षेलाभकरंस्मृतं ॥ हानि-
दंदक्षिणेहस्तेहृदयेचसुखावहं ॥ ६ ॥ वामह-
स्तेतुरोगाश्चकुक्ष्योःशोकस्तथैवच ॥ पादयो-
र्हानिरोगाश्चजन्मधिष्ण्यादिचंद्रभं ॥७॥ भौम ॥
भौमचक्रंप्रवक्ष्यामिजन्मधिष्ण्यादिभौमजं ॥शी-
र्षेषट्कंमुखेत्रीणित्रीणिवैदक्षिणेकरे ॥८॥ पादयोः
षट्प्रदातव्यंवामहस्तेत्रयंतथा ॥ गुह्येचैकंनेत्र-
योर्द्वेहृदयेत्रयमेवच ॥ ९ ॥ फल ॥ विजयश्चैव-
रोगश्चलक्ष्मीःपंथाभयंतथा ॥ मृत्युर्लाभः
सुखंचापिफलंज्ञेयंविचक्षणैः ॥ १० ॥

वुधचक्र ॥ ॥ बुधेचक्रंप्रवक्ष्यामिजन्मऋक्षा-
दिसौम्यभं ॥ शिरसित्रीणिराज्यंस्याद्वक्रैकंधन-
धान्यदं ॥ ११ ॥ नेत्रेद्वेप्रीतिलाभौचनाभौश्रीः
पंचकंतथा ॥ पादयोःषट्प्रवासश्चवामेवेदकरेत-
था ॥ १२ ॥ चत्वारिदक्षिणेहस्तेधनलाभस्तथै-
वच ॥ गुह्यस्थानेभद्वयंचबंधनंमरणंफलं ॥ १३ ॥
॥ गुरु ॥ गुरुचक्रंप्रवक्ष्यामिगुरुभाज्जन्मऋक्ष-

भं ॥ दद्याच्छिरसिचत्वारिचत्वारिदक्षिणेकरे॥ १४
एकंकंठेमुखेपंचपादयोःषट्प्रदापयेत् ॥ करेवा-
मेचचत्वारित्रीणिदद्याच्चनेत्रयोः ॥ १५ ॥ फलं ॥
॥ राज्यंलक्ष्मीर्धनप्राप्तिःपीडामृत्युस्तथैवच ॥ सु
खंसुखंक्रमेणैवफलंज्ञेयंविचक्षणैः ॥ १६ ॥

शुक्र ॥ ॥ शुक्रचक्रंप्रवक्ष्यामिशुक्राधिष्ण्यात्तु
जन्मभं ॥ मुखेत्रीणिमहालाभःशीर्षेपंचशुभाव-
हः ॥ १७ ॥ त्रिकंतुदक्षिणेपादेक्लेशहानिकरंस-
दा ॥ तथैववामपादेचत्रीणिभानितुयोजयेत् ॥ १८
हृदयेद्वेधनंसौख्यंभाष्टकंहस्तयोर्द्वयोः ॥ मित्रात्सु-
खंधनप्राप्तिर्गुह्येत्रीणितथैवच ॥ स्त्रीलाभश्चफ-
लंप्रोक्तंभृगुचक्रेचसूरिभिः ॥ १९ ॥ ॥ शनिचक्र॥
सौरिचक्रंप्रवक्ष्यामिसौरिभाजन्मऋक्षभं ॥ य-
त्रसौरिस्तदास्यैकंकरेचत्वारिदक्षिणे ॥ २० ॥
विन्यसेत्पादयुग्मेषट्वामबाहौचतुष्टयं ॥ हृदयेपं-
चऋक्षाणिक्रमाल्लोचनयोर्द्वयं ॥ २१ ॥ मूर्ध्निद्वयं
गुदेचैकंमंदस्यपुरुषाकृतेः ॥ फलं ॥ वक्त्रस्थेज-
न्मभेरोगोलाभोवैदक्षिणेकरे ॥ स्याद्ध्वाचरण-
द्वंद्वेबंधोवामकरेन्नृणां ॥ २२ ॥ हृदयेपंचलाभो
वैनेत्रेप्रीतिरुदाहृता ॥ पूजामूर्ध्निपरानूनंगुदेमृ-

त्युंविनिर्दिशेत् ॥ २३ ॥ राहु ॥ राहुचक्रंप्रवक्ष्यामिजन्मभाद्राहुऋक्षभं ॥ मूर्ध्नित्रीणितथाचोक्तंकरेचत्वारिदक्षिणे ॥ २४ ॥ पादयोःषट्प्रदातव्यंवामहस्तेचतुष्टयं ॥ हृदयेत्रीणिकंठेकंमुखेद्वेनेत्रयोर्द्वयं ॥ गुह्येद्वयंक्रमेणैवंराहुचक्रंस्वभावतः ॥ २५ ॥ फलं ॥ राज्यंरिपुक्षयंपंथामृत्युर्लाभोऽथरोगकः ॥ जयःसौख्यंतथाकष्टंक्रमाज्ज्ञेयंफलंबुधैः ॥ २६ ॥ केतु ॥ केतुचक्रंप्रवक्ष्यामिजन्मभात्केतुऋक्षभं ॥ मूर्ध्निपंचजयश्चैवमुखेपंचमहद्भयं ॥ २७ ॥ हस्तयोर्भानिचत्वारिविजयश्चजयस्तथा ॥ पादयोःषट्चसौख्यंस्याद्धृदिद्वेशोककारकं ॥ कंठेचत्वारिचव्याधिर्गुह्येकंचमहद्भयं ॥ २८ ॥

| सूर्य. | | | चंद्र. | | | मंगळ. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सूर्य संक्रांत ज्या नक्षत्री असेल तेथून जन्म नक्षत्रापर्यंत मोजून जेथें नक्षत्र पडेल तें फळ जाणावें. | | | जन्म नक्षत्रा पासून ज्या नक्षत्री चंद्र असेल तेथपर्यंत मोजून जेथें नक्षत्र पडेल तें फळ जाणावें. | | | जन्म नक्षत्रापासून ज्या नक्षत्री भौम असेल तेथपर्यंत मोजून जेथें नक्षत्र पडेल तें फळ जाणावें. | | |
| स्थानें. | न. | फळें. | स्थानें. | न | फळें | स्थानें. | न. | फळें. |
| मुखावर. | २ | रोग प्राप्ति. | मस्तकावर. | ६ | लाभ. | शिरावर. | ६ | विजय. |
| उ. हातावर | ४ | लाभ. | मुखावर. | १ | द्रव्यहरण. | मुखावर. | ३ | रोगप्राप्ति. |
| पायावर. | ६ | मार्ग चाल. | उ. हातावर. | ३ | हानि. | उ. हातावर | ३ | लक्ष्मीप्रा० |
| डावाबाहु. | ४ | बधन. | हृदयावर. | ६ | सुख. प्रा० | पायांवर. | ६ | मार्ग चाल. |
| हृदयावर. | ५ | लाभ. | डाव्या हा० | ३ | रोगप्राप्ति. | डावाबाहु. | ३ | भय. |
| नेत्रावर. | ४ | लक्ष्मी प्रा० | कुक्षीवर. | ६ | शोक. | गुदावर. | १ | मृत्यु. |
| मस्तकावर | १ | राजगृही पू. | उज. पाया. | १ | हानि. | नेत्रावर. | २ | लाभ. |
| गुदावर. | १ | अपमृत्यु. | डा. पाया. | १ | रोगप्राप्ति. | हृदयावर | ३ | सुखप्रा० |

| बुध. | | | गुरु. | | | शुक्र. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जन्म नक्षत्रापासून बुध ज्या नक्षत्री असेल तेथपर्यंत मोजून ज्यास्थानीं पडेल त्या स्थानाचें फळ जाणावें | | | गुरु ज्यानक्षत्री असेल तेथपासून जन्म नक्षत्रा पावेतों मोजून ज्यास्थानी पडेल त्या स्थानाचें फळ जाणावें. | | | शुक्र ज्यानक्षत्री असेल तेथपासून जन्म नक्षत्रा पावेतों मोजून ज्यास्थानी पडेल त्या स्थानाचें फळ जाणावें. | | |
| स्थानें. | न. | फळें. | स्थानें. | न. | फळें. | स्थानें. | न. | फळें. |
| मस्तकावर | ३ | राज्य प्रा. | मस्तकावर | ४ | राज्यप्रा. | मुखावर | ३ | उत्तमलाभ |
| मुखावर | १ | धनलाभ | उ. हात. | ४ | लक्ष्मीलाभ | मस्तकावर | ५ | शुभ |
| नेत्रावर | २ | प्रीतिलाभ | कंठावर | १ | धनलाभ | डा. पायां. | ३ | क्लेश |
| नाभीवर | ५ | लक्ष्मीप्रा. | मुखावर | ५ | पीडा | उ. पायां. | ३ | हानि |
| पायांवर | ६ | प्रवास | पांयांवर | ६ | मृत्यु | हृदयावर | २ | धनसौख्य |
| डा. हाता. | ४ | धनलाभ | डा. हात. | ४ | सुखप्रा. | हातावर | ८ | मित्रसुख |
| उ. हाता. | ४ | धनलाभ | नेत्रांवर | ३ | सुखप्रा. | गुल्यावर | ३ | स्त्रीलाभ |
| गुदावर | २ | बंधनमर. | | | | | | |

| शनि. | | | राहु. | | | केतु. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शनि ज्या नक्षत्रीं असेल तेथपासून जन्म नक्षत्रा पावेतों मोजून ज्यास्थानी नक्षत्र पडेल तें फल जाणावें. | | | जन्म नक्षत्रा पासून राहु नक्षत्रा पावेतों मोजावें व जेथें नक्षत्र पडेल तें फळ जाणावें. | | | जन्म नक्षत्रा पासून केतु ज्या नक्षत्री असेल तेथ पर्यंत मोजून जेथें नक्षत्र पडेल तें फळ जाणावें. | | |
| स्थानें. | न. | फळें. | स्थानें. | न. | फळें. | स्थानें. | न. | फळें. |
| मुखावर | १ | रोग. | मस्तकावर | ३ | राज्यप्रा. | मस्तकी. | ५ | जयप्राप्ति. |
| उ. हाताव | ४ | लाभ. | उ. हाताव. | ४ | रिपुक्षय. | मुखावर. | ५ | मोठें भय. |
| पायांवर | ६ | मार्गचाल. | पायांवर | ६ | मार्गचाल. | हातावर. | ४ | विजय. |
| वामहाता. | ४ | बंधन. | डा. हाता. | ४ | मृत्यु. | पायांवर. | ६ | सौख्य. |
| हृदयाव. | ५ | लाभ. | हृदयांवर | ३ | लोभफार. | हृदयावर. | २ | शोक. |
| नेत्रांवर | ४ | प्रीति. | कंठावर | १ | रोग. | कठावर. | ४ | व्याधि. |
| मस्तकाव. | २ | पूजा. | मुखावर | २ | भय. | गुह्यावर. | १ | मोठें भय. |
| गुदावर | १ | मृत्यु. | नेत्रांवर | २ | सौख्य. | | | |
| | | | गुल्यावर | २ | कष्ट. | | | |

## जन्मनक्षत्र कोठें पडलें तें पाहाणें.

## शीर्षेत्रीणिमुखेत्रयंचरविभादेकैककंस्कंधयोरेकैकं

भुजयोस्तथाकरतलेधिष्ण्यानिपंचोदरे ॥ नाभौ
गुह्यतलेचजानुयुगुलेएकैकऋक्षंक्षिपेज्जंतोःके-
चिदितिब्रुवंतिगणकाःशेषाणिपादद्वये ॥ १ ॥
अल्पायुश्चरणस्थितेचगमनंदेशांतरेजानुभिर्गुह्ये
स्यात्परदारलंपटमहोनाभौचसौख्यप्रदं ॥ ऐ-
श्वर्यंहृदिचौर्यमस्यकरयोर्बाह्वोर्बलंश्रूयतेतद्वत्के-
नचमिष्टमन्नमशनंराज्यंस्थितंमूर्धनि ॥ २ ॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रा पासून जन्म नक्षत्रा पावेतों मोजून प्रथम ३ नक्षत्रें म-स्तकावर त्यांचें फल राज्य प्राप्ति; पुढें मुखावर ३ न० मिष्टान्न भक्षण, प्रत्येक खांद्यावर एक एक बलवान् असेल; भुजांवर एक एक यांचे फळ बळवान् असेल; तळहातावर एक एक चोर; हृदयावर५ ऐश्वर्य; नाभीवर१ सुखप्राप्ति; गुह्यावर १ परदारालंपट; जानूंवर १,१ देशांतर गमन करील; प्रत्येक पाव-लावर ३,३ अल्पायुषी याप्रमाणें जेथें जन्म नक्षत्र पडेल तें फळ सांगावें.

## लग्नशुद्धीसपंचक पाहणें.

गततिथियुतलग्नंनंदहृच्छेषकंचवसुयमयुगषट्-
केक्षोणिसंख्याक्रमेण ॥ गदनलनृपचौरंमृत्युदं
पंचकंस्यात्व्रतगृहनृपमार्गोद्वाहकेवर्जनीयं ॥ १ ॥

अर्थः—गततिथि मोजून त्यांत लग्न मिळवावें आणि नवानी भागून शेष उरेल त्याजवरून फळ पहावें. ८ उरलें तर रोग पंचक तें मुंजीस वर्ज. २ उ-रले तर अग्निपचक, तें गृहारंभास वर्ज. ४ उरले तर राजपंचक, राजसेवेसवर्ज ६ चोर पचक प्रयाणास वर्ज्य; १ उरला तर मृत्युपंचक तें विवाहास वर्ज यां शिवाय शेषांक उरल्यास निष्पचक जाणावें तें सर्वांस उक्त होय.

## वारपरत्वें पंचकेंवर्ज्यं.

रवौरोगंकुजेवन्हिःसोमेवैराजपंचकं ॥ बुधेचौरं
शनौमृत्युःपंचकानितुवर्जयेत् ॥ १ ॥

अर्थः—रविवारी रोगपंचक, मंगळवारी अग्निपंचक, सोमवारीं राजपंचक बुधवारी चोरपंचक आणि शनिवारीं मृत्युपंचक अशी वार परत्वें पचकें वर्जावीं.

## दिनमान व रात्रिमान.

अयनादिकवासररामहतागगनानलबाणशशां-
कयुताः ॥ परिभाजितशून्यरसैर्घटिकाःकर्का-
दिनिशामकरादिदिनं ॥ १ ॥

अर्थ.—अयन ह्मणजे कर्कसंक्रांती पासून मकर संक्रांती पर्यंत महिने ६ तसेच मकरा पासून कर्का पावेतों महिने ६ ज्या दिवसाचें दिनमान करावयाचें तेथ पर्यंत एकंदर दिवस मोजून त्याला तिहिंनीं गुणून जे अंक येतील त्यांत १५, ३० मिळवावे आणि ६० नीं भागून-जें शेष उरेल तें रात्रिमान जाणावे व मकर संक्रांती पासून मोजलें असतां दिनमान येतें. हे मान अगदि सामान्यतः स्थूल आहे.

## दिवसकितीआला तें पाहणें.

पादप्रभानगयुतारहिताचमेषात्षटास्विंदुतात्रि
युगबाणशराब्धिरामैः ॥ स्याद्भाजकोदिनदल-
स्यनगाहतस्यपूर्वेगताःस्युरपरेदिनशेषनाड्यः ॥१॥

अर्थ.—आपली छाया पावलांनीं मोजावी आणि जितकीं पावलें होतील त्यांत ७ मिळवावे व जी संक्रांत असेल त्या संक्रांतीचा क्षेपक वजा करावा, तो असा कीं, मेषापासून कन्येपर्यंत क्षेपक १, तूलेस ३, वृश्चिकास ४, धनास ५, मकरास ५, कुंभास ४, मीनास ३, याप्रमाणें अंक वजा करून निराळे मांडून ठेवावे, नंतर दिनदळ म्हणजे १५ यांस ७ नीं गुणून १०५ होतात यांस मागें ठेवलेल्या अंकांनीं भागावें. जो भागांक येईल त्या घटिका झाल्या परंतु पूर्वार्धीं दिवस तितक्या घटिका आला आणि उत्तरार्धीं दिवस उरला असें जाणावें.

## रात्रकिती जाह्ली तें पाहाणें.

सूर्यभान्मध्यनक्षत्रंसप्तसंख्याविशोधितं ॥ विंश-
तिघ्नंनवहृतंगतारात्रिःस्फुटाभवेत् ॥ १ ॥

अर्थ.—रात्रीस जें मध्य नक्षत्र आलें असेल तितकीं नक्षत्रें सूर्यनक्षत्रा-पासून मोजून त्यांत ७ कमी करावे आणि जें शेष राहील तें विसांनी गुणून नवांनी भागावें शेष उरेल तें रात्रि भुक्त जाणावें. हे ही मान स्थूल आहे.

## अंतरंगवहिरंगनक्षत्रें.

सूर्यभादुडुगणंपुनःपुनर्गण्यतामितिचतुष्टयंत्रयं ॥
अंतरंगवहिरंगसंज्ञकंतत्रकर्मविदधीततादृशं ॥१॥

अर्थ.—सूर्य नक्षत्रापासून प्रथम ४ नक्षत्रें आंतले चालीचीं होत आणि नंतर ३ नक्षत्रें बाहेरचे चालीचीं होत. अशा क्रमानें दिवस नक्षत्रापावेतों मोजावें. गुरें आणण्यास आंतले चालीचीं व बाहेर पोंचविण्यास बाहेरचे चालीचीं नक्षत्रें होत.

## सूतिकास्नानासनक्षत्रें.

करेंद्रभाग्यानिलवासवांत्यमैत्रेंदवाश्विध्रुवभेन्हि-
पुंसां ॥ तिथावरिक्तेशुभमामनंतिप्रसूतिकास्ना-
नविधिंमुनींद्राः ॥ १ ॥

अर्थ.—हस्त, ज्येष्ठा, पूर्वाफाल्गुनी, स्वाती, धनिष्ठा, रेवती, अनुराधा, मृग, अश्विनी आणि ध्रुवनक्षत्रें यांतील नक्षत्रें यांवर व रवि, मंगळ, गुरु, यांच्या वारी रिक्ता तिथी वर्ज करून सूतिकेस स्नान करवावें.

